मूड कोणाचा नघेणें, बरी ती क्षमा करणें.
लोकावरी क्षमा करी, स्वतें पश्चात्ताप धरी.
क्रोध जातो बोलतांना, दुःख शमतें रडतांना.
क्रोध हा एक ज्वरा परी, जाऊन अशक्त करी.

क्रोधें शहाणपण जातें, गुप्त मौर्ख्य बाहेर येतें.

राग जाण्यास उपाय, विवेकचि खरा होय.
स्वभावें जन कोपिष्ट, त्याचे मनीं नसे कपट.
मागले कष्ट, वाटती मिष्ट.
हातांतून समय जातो, पूढें असाध्यचि होतो.

कप्या लावि तो संसार जाणा, कप्यावर कप्या तो भिकारपणा.

धैर्य धरून श्रम घेती, पर्वतादिक उलटती.
वाट पाहे दम धरी, वाटे दिवस उदास तरी.
शांति पुष्पलता असे, सर्व उपवनीं नसे. अ० शांति नाहीं, सर्वां ठायीं.
शांति मलमपटी परी, सर्व जखमी बऱ्या करी.
सहनशीलता कडवट, परी अंतीं तिचें फळ मिष्ट. ह्म० टाकीचे
घाय सहाणें, देवकळा पावणें.
दुःखास उपाय कांहीं, शांती शिवाय नाहीं.
द्रव्य इष्क साध्यकरतां, उपाय नाहीं शांती परता.
धैर्य पैका काळ अनकूळ, सर्व घडून येतें तात्काळ.

धिरज धरम मितर और नार, आपत काल परखते च्यार.

गरीबीं शांति धरूनिया राहे, तो गरिबांस उपाय आहे.
रोख घ्यावें द्यावें, खातें न ठेवावें.

2711 Pay not to fortune the regard you owe to merit.

2712 Pay what you owe, and what you are worth you'll know.

2713 Peace flourishes when reason rules.

2714 Peace would be universal, if there were neither mine or thine.—*Italian.*

2715 Pedantry is a vice in all professions.

2716 Penny and penny laid up will be many. See. No2 16.

2717 Penny in pocket is a good companion. See No.2464.

2718 Penny wise and pound foolish.

2719 People become great through performing their duty.—*Oriental.*

2720 People seldom learn economy, till they spent their fortune.

2721 People who live in glass houses, should never throw stones.

2722 Perfect friendship cannot be impaired.

2723 Perfect love never settled in a light head.

2724 Perfection is the point at which all should aim.

2725 Perseverence is the crown of all great actions.

2726 Person generous with the property of another. —*Oriental.* See No. 2328.

2727 Perspecuity is the best kind of eloquence.

2728 Physician cure thyself.—*French.*

2729 Physician's faults are covered with earth, and rich man's with money.

2730 Physicians rarely take medicine.—*Italian.*

योग्यतेनें मिळवी, तें दैवावर न घालवी.
देऊन फेडी लोकांचें कर्ज, राहील तें तुझें समज.

जेथें बुद्धीचा प्रकाश, तेथें शांतीचा वास.
माझें तुझें नसतें, लोकीं समाधान असतें.

विद्येचा डौल घालणें, कसबीं लांछन लावून घेणें.
संग्रह करी पैसा पैसा, काळेंकरून होतो लैसा.
खिशांत पैका, तो सोबती बरा देखा.
मिळवी कवडी कवडी, एकदम रुपया दवडी.
उद्योग करिती, थोरी मिळवती.

जवळची पुंजी सरती, मग काटकसर करिती.

आरसेमहालांत राहाणें, तर दगड न उडवणें. अ० आपला ना-
श आपण, नकरावा जाण.
पूर्ण मैत्रिकीचा हेत, नाहीं तुटला जात.
अल्पबुद्धि असे, तेथें प्रीति न ठसे.
कार्यसिद्धीवरी, सर्वांचें लक्ष भारी.
कामालागी झटून पडणें, त्यास कामाचा कळस ह्मणणें.
सासूचे जीवावर, जावयजी उदार.

बोलण्याची स्पष्ट युक्ति, चांगली ती वाचा शक्ति.
वैद्यें स्वयें निरोगी व्हावें, मग दुसऱ्या औषध द्यावें.
वैद्य औषधानें मारिती, तेणें दोष आच्छादती, धनिक धनव्यय करिती, निजदोष लपविती.
वैद्य औषध विरळा घेती, बरी प्रकृति राखिती.

2731 Plain-dealing is a jewel; but they that use it die beggars.

2732 Plain-dealing is more praised than practised.

2733 Play, woman and wine, undo men laughing.

2734 Pleasant company alone makes this life tolerable, —*Spanish.*

2735 Pleasant hours fly fast.

2736 Pleasing ware is half sold.—*French.*

2737 Pleasure in excess is criminal.

2738 Pleasure is precarious but virtue is immortal.

2739 Pleasures are very short; pains are very long.

2740 Pleasures over-purchased are real torments.

2741 Pleasures unduly taken make fools of the wise.

2742 Pleasures while they flatter, sting to death.

2743 Plenty makes dainty.

2744 Plough-men on their legs are higher than gentlemen on their knees.

2745 Poets are born, but orators are made.—*Latin.*

2746 Policy goes beyond strengh.—*French.*

2747 Policy often effects what force cannot.

2748 Politeness is the science of the civility.

2749 Pomp ruins families, and leads to the corruption of manners.

2750 Poor folks seek meat for their stomach; and rich folks stomach for their meat.—*Scotch.*

2751 Poor freedom is better than rich slavery. See No. 2123.

2752 Poor indeed is he who thinks he has never enough.

सरळ व्यवहार करिती, निर्धनिक होऊनिया मरती.

सरळ व्यवहारीं करिती स्तुती, सरळपणे थोडे आचरती.
दारू जुवा रंडीबाजी, तेणें लोकीं इतराजी.
चांगली असतां संगत, जीव राहतो नेमांत.

आनंदाची घडी येती, नकळतां निघून जाती.
चांगले मालावरती, सर्वांच्या उड्या पडती.
अमर्यादेनें मौजा करिती, होय पापाची ती भरती.
मौज आहे क्षणभंगुर, सदाचरण अमर.
मौजा थोडे दिवस, दुःखणें बहुवस. अ० मौजा मारतां पुरेना हौस, दुखणें येतां कसमस.
पैका उडऊन मौजा मारी, परम दुःखी सरल्यावरी.
मौजा अनुचित मारिती, शहाण्याचे मूर्ख दिसती.
मौजा गोड हो वाटती, डंश करून प्राण घेती.
जेवढा गूळ सोडी, तेवढी होय गोडी. ह्म० हाटापेक्षां हात गोड.
उभ्या कुळंब्यांचा संसार, पडल्या श्रीमंतापेक्षां थोर. अ० उद्योगें पैका वाढतो, बसून खातां खुटतो.
कवि जन्मती स्वभावानें, पंडित होती शिकण्यानें.
व्यवहार चातुर्य, बळाहून अधिक होय.
जें होत नाहीं बळानें, तें करावें चतुराईनें.
जो कीं असे ग्रहस्थपणा, तोचि जाणा मनुष्यपणा.
डामडौलें कुटुंबाची हानी, चांगले रीतीची नुकसानी.

गरीबें भुकेसाठीं खाणें मागती, श्रीमंतां अन्न असतां क्षुधा नसती.

मोकळेपणें गरिबी बरी, बंधन असून नलगे थोरी.
लोभ आहे अधिक ज्यास, केवळ गरीब ह्मणा त्यास.

2753 Poor men may think well, but rich men may think well and do well.

2754 Poor men want many things, but covetous men all.

2755 Popular opinion is the greatest truth in the world.

2756 Positive men are most often in error.

2757 Possession is nine points of the law.

2758 Postpone not for another day, what should be done this. See No. 2426.

2759 Poverty and shame attend those who refuse instruction.

2760 Poverty craves many things, but avarice more. —*Italian.*

2761 Poverty has no shame.—*Spanish.*

2762 Poverty is a complication of evils.

2763 Poverty is no baseness, but it is a branch of knavery. —*Spanish.*

2764 Poverty is shamefully born by a sluggard.

2765 Poverty is the mother of all arts.—*Italian.*

2766 Poverty on an old man's back is a heavy burthen.

2767 Poverty parts friends.

2768 Poverty secures us from many dangers, to which the rich are exposed.

2769 Poverty wants some, luxury many; avarice all things.

2770 Poverty without debt is independence.

2771 Power discovers the real disposition of a man.

2772 Power should not be employed to do wrong, but to punish the doers of wrong.

गरीबाच्या कल्पना व्यर्थ जाती, श्रीमंत करिती सिद्धीस नेती.

गरजें पुरतें गरीबांस, सर्व लागतें लोभ्यास.
जनाचें मत, तेंच माना सत्य.
मताग्रही बहुत, पडतात हो चूकींत.
स्वाधीन आलें, तें आपलें झालें.
आज करणें तें करावें, उद्यावर नठेवावें.

हित बोधा सारीं मार्गें, दरिद्र लज्जा त्यायोगें.

गरीबीची धांव थोडी, लोभाची तों मोठी उडी.

गरिबीस कांहीं, बाध येत नाहीं.
गरिबीचे माघारीं, अरिष्टांची स्वारी.
गरिबी नव्हे नीचपण, पण तिचें नमानिती जाण.

दरिद्राची उत्पत्ति, आळशाचे संगति.
गरीबी पासून उत्पन्न, कलाकुशलता जाण.
म्हातारपणीं दरिद्राची स्वारी, येतांना कष्ट वाटती भारी.
गरिबी आल्यावरी, मित्र बसती घरीं.
धनवंता विघ्नें बहुत, थोडीं गरीबींत येत.

गरिब इछितो परिमित, इछी विषयी बहुत, लोभीयाचा लोभ
अंत, कधी नघडे.
गरीबींत नजरीं ऋण, तेच म्हणावें स्वतंत्रपण.
अधिकार आल्यावरती, मूळ स्वभाव प्रगटती.
सत्तेनें आपराध्यांस शासन करणें, सत्तेनें वाईट कर्म न करणें.

2773 Power weakeneth the wicked. See No. 45.

2774 Praise, like gold and diamonds, owes its value only to its scarcity.

2775 Praise is as the reflection of virtue, as the glass that gives the reflection.

2776 Praise is pleasing to him that thinks he deserves it.

2777 Praise is the hire of virtue.—*Latin.*

2778 Praise makes good men better, and bad men worse.

2779 Praise no man too liberally before his face, nor censure any man severely behind his back.

2780 Praise not the day before night.

2781 Praise not the unworthy, though they roll in riches.

2782 Praise nothing but what you know to be worthy of praise.

2783 Praise the man whose bread you eat.—*Oriental.* See No. 2444.

2784 Praise without profit, puts little in the pocket.

2785 Prate is but prate; it is money buys land.

2786 Prayer is the wing wherewith the soul flies to heaven.

2787 Prayer should be the key of the day, and the lock of the night.

2788 Precepts may lead, but examples draw.

2789 Prefer loss to unjust gain.

2790 Prepare for sickness in the day of health, and for old age in thy youth.

2791 Presence of mind is necessary at all times.

सत्ता दुष्टांहातीं, देतो विपरीत करिती.
सुवर्ण रत्नाचा बहु तोटा, तैसा कीर्तीचा आहे मोठा.

सदाचरणीं स्तुति वसे, जैसें दर्पणीं प्रतिबिंब दिसें.

योग्य स्तुति करिती, ती गोड वाटती.
सद्गुणाचा उपज, तीच स्तुति समज.
सज्जन स्तुतीनें सुधारतो, दुर्जन स्तुतीनें बिघडतो.
निंदा कोणाची न करी माघारी, प्रशंसा न करी तोंडा वरी.

बरा दिवस लोटल्यावरी, रात्रीं दिवसाची स्तुति करी.
अगुणीयांचा स्तव न करी, लक्ष्मी त्यांचे घरीं जरीं पाणी भरी.
स्तुति न करावी एरवी, योग्यता पाहून करावी.

ज्याचें भक्षावें अन्न, त्याचें इछावें कल्याण.

करावी उगीच स्तुति, तींत लागे काय हातीं.
बडबड करितां नाहीं जोम, पैका करितो सर्व काम.
भक्तिस्वरूपीं पंख होती, जीवा उडवून स्वर्गीं नेती.

भक्ति दिवसा साह्य करी, सांभाळी रात्र झाल्यावरी.

उपदेशानें मार्ग लागतो, दृष्टांतानें समज होतो.
सोड हरामाची प्राप्ती, जरीं तोटा आला हातीं. पु० कुकर्माची जोड, तोटा आला तरी सोड.
स्वगात्रें चालतीं तोंवरी, कांहीं द्रव्य संग्रह करी. दुःखणें जरा आलियावरी, उपयोगी तें पडें तरीं.
मनाचा सावधपणा, वारंवार उपयोगी जाणा.

2792 Presence of mind will often extricate us from imminent danger.

2793 Preserve carefully your reputation.

2794 Preserve the character of others, so that they may preserve yours.

2795 Preserve thyself from the occasion, and God will preserve thee from the sin.

2796 Prettiness dies quickly. See No. 523.

2797 Prettiness make no pottage.

2798 Prevention is better than cure.

2799 Pride and poverty are ill met, yet often together.

2800 Pride and self-sufficiency cheat us through life.

2801 Pride goes before, and shame follows after.

2802 Pride goeth before destruction, and an haughty spirit before a fall.—*Scriptural.*

2803 Pride has many difficulties, but vanity more disappointments.

2804 Pride in a beauty is like a flaw in a diamond.

2805 Pride hides our own faults, and magnifies the faults of others.

2806 Pride in prosperity turns to misery in adversity.

2807 Pride increases our enemies, but puts our friends to flight.

2808 Pride is easily seen in others, but we can rarely see it in ourselves.

2809 Pride is the effect of self-ignorance.

मनीं धरी सांवधगिरी, मोठें संकट निवारी.

प्रतिष्ठा आपली, सांभाळ चांगली.
रख पत, जो रखावे पत. अ० दुजीयाची पत्त राख, तो ठेवील
तुझी साख.
उपाधीपासून राहे दूर, पापापासून रक्षी ईश्वर.

सौंदर्याचा भर, जातो लवकर.
सुंदर सकुमार, सैपाकाची मारामार.
अपायीं उपाय करावा, त्यापेक्षां तो न होऊं द्यावा.
दैन्य ताठा विलग सोबती, जगीं एकत्र वास करिती. ह्म० भि-
कान्याच्या पोराला ओकारी भारी.
धरितां गर्व आणि स्वार्थ, संसारीं होय अनर्थ.
गर्वगती पुढे होती, तिचे मागे लज्जा जाती.
विनाशापूर्वी गर्व येतो, पडल्यापूर्वी उन्मत होतो. सं० नाशा-
त्पूर्व्वमहंकारो मनुष्याणां प्रजायते, गर्व्वश्च पतनात् पू-
र्व्वं मनुष्याणां प्रजायते.
अभिमाने संकटें येतीं, दिमाखानें आशा भंग होती.

सौदर्यांत धरतो तोरा, हिऱ्यापोटीं जसा दोरा.
अभिमान स्वदोष लपवितो, दुजयाचा प्रगट करितो.

भाग्यकाळीं अभिमान धरी, विपत्तीवेळीं मान हरी.
अभिमान वैरी वाढवी, मित्रजना दूर करवी.

इतराचां गर्व पहावा, आपले अंगीं न ठेवावा.

गर्वाचें कारण, तें अज्ञान जाण.

2810 Pride is as loud a beggar as want, and a great deal more saucy.

2811 Pride, like a wild horse, overthrows its rider.

2812 Pride makes youth inglorious, and age shameful.

2813 Pride of heart foreruns destruction.

2814 Pride often borrows the cloak of humility.

2815 Pride that dines on vanity, sups on contempt.

2816 Pride will have a fall.

2817 Princes may bestow preferments, but they cannot make men truly honorable.

2818 Procrastination is the thief of time.

2819 Prodigality is born a wonder, and dies a beggar.

2820 Promise little and do much.

2821 Promises are like pie-crust, made to be broken.

2822 Prosperity and vanity are often lodged together.

2823 Prosperity destroys fools, and endangers the wise.

2824 Prosperity discovers vices, and adversity virtue.

2825 Prosperity engenders sloth.—*Latin.*

2826 Prosperity makes friends, and adversity tries them.

2827 Prosperity is no just scale, adversity is the only balance to weigh friends in.

2828 Prosperous men seldom mend their faults.

2829 Proud looks lose hearts, but courteous words win them.—*Latin.*

2830 Proverbs are patent teachers, and maxims are moral demonstrations.

2831 Provide for the worst, the best will save itself.

भिकाऱ्याचें हांक मारून मागणें, तसें गर्वाचें उद्धट बोलणें.

गर्व जंगली घोड्यापरी, पाडि त्या जो स्वारी करी.
तरुणीं गर्व धरतां कीर्ति हारक, तोच वृद्धपणीं लज्जा कारक.
मनीं अहंकार धरी, कार्याचा नाशकरी.
अभिमान कार्या करितां, धरितो वारंवार नम्रता.
गर्वानें फुगती, त्यांस तुच्छ मानिती.
गर्वातें धरिती, ते खालीं पडती. पु० जो चढे, तो पडे.
राजे मोठे अमल सर्वांसीं देती, वाईट बरें चालवणें घेणारा हातीं.

टाळाटाळी करणें, तो समय चोरणें.
उधळेपणाचा जन्म चमत्कार, भिकारी होऊन मरणार.
थोडें कबूल करी, दे बहुता परी.
बहुवचनाचा पाल्हाळ, भंग होतो तात्काळ.
फुशारी आणि संपति, एका स्थानीं वास करिती.
संपति मूर्खांचा नाश करिती, शहाण्याला भयांत घालती.
संपत्तींत दुर्गुण उमटती, विपत्तींत सद्गुण समजती.
तालेवारी येती, सुस्ती उत्पन्न होती.
भाग्यकाळीं मित्र जोड, विपत्तिकाळीं ताडातोड.
मित्र कळती आपत्काळी, समजत नसती भाग्य वेळीं. सं०
आपदिमित्रपरीक्षा.
श्रीमंता खोडी असती, विरळा सूधारून घेती.
क्रूर दृष्टी भयंकरी, आर्जव शब्दें भयें वारी.

ह्मणी उपदेश कारक, नीति दृष्टांत दायक.

वाईटांशीं उपाय कर, चांगलें स्वयें राहणार.

2832 Provide your remedy before the evil.—*Oriental.*

2833 Provisions are better in the belly than on the back —*Persian.*

2834 Provoke not the age of a patient man,

2835 Prudence guides the wise, but passion governs the foolish.

2836 Prudence is commendable but pride is always abominable.

2837 Prudence is the conductor of all virtues.

2838 Prudence is the mother of generosity and charity.

2839 Pry not into the affairs of others,

2840 Punctuality is the soul of business,

2841 Punctuality begets confidence, and is the sure path to honor and respect.

2842 Punishment and reward act like the bridle and spur.

2843 Punishment though lame, yet overtakes the sinner at last.

2844 Purchase by persuation rather than enjoy by violence.

2845 Pure religion is the fountain of truth.

2846 Pure water dissolves inflammation, but mild discourse dissolves anger.

2847 Purposing without performing is mere fooling.

2848 Put no faith in tale-bearers.

2849 Put not a naked sword in a mad man's hand.

2850 Put not off repentance till a future day.

2851 Put not thy hand between the bark and the tree.

आसुवला आधीं किक फोडावी, पाण्या आधीं वळणें बांधावीं.
गु० पांनी पेहेला, पाल बांधवी.
अन्न पाठीवर नेणें, त्यापेक्षां पोटीं खाणें. अ० द्रव्यसंग्रह करणें, त्याहून बरें भोगणें.
शांत मनुष्याचा राग, न चाळवावा तो सुमार्ग.
शहाण्याचे मनीं शहाणपण, मूर्खाचे मनीं क्रोध जाण. अ० चतुराईनें शहाणे वागती, क्रोधानें मूर्ख चालती.
चतुराईची स्तुती करिती, अहंकार द्वेषप्राय मानती.

सद्गुणाची चालिवणारी, चतुराईच ती खरी.
दानधर्माची आई, ती जाणे चतुराई.
दुसऱ्याचे व्यवहारांगी, न करावी ढुंगाढुंगी.
कामाचे जीवन, तें समय रक्षण.
समयरक्षण विश्वासाचें कारण, तेणें थोरपणा मिळतो जाण.

बक्षीस शासनाची वर्तणूक, जैशी घोड्या लगाम चाबूक.
पाप्यास शासन, न कधीं सोडी जाण.

खुशीकरून घेणें, जोराकरून न ठेवणें.
जो धर्म खरा, तो सत्याचा झरा.
स्वच्छ जळें दाहा शमतो, मृदु शब्दें क्रोध जातो.

व्यर्थ योजना करणें, तें मूर्खत्वचि जाणें.
चहाड्याचा इतबार, करूं नये हें सार.
वेड्याहातीं तरवार, देऊं नये करील वार.
वरचेवरी पश्चात्ताप करी, न ठेवी दुसऱ्या दिवसावरी.
फाटक्यांत पाय घालूं नये, घरखटल्यांत पडूं नये.

2852 Put off your armour, and then shew your courage.

2853 Put on your spurs and be at your speed.—*Scotch.*

2854 Put to your tongue a bridle, that it talks not idle.

2855 Put your finger in the fire, and say it was your ill fortune.—*Scotch.*

---

# Q.

2856 Qualify exorbitant passions with quietness and patience.

2857 Quality without quantity is little thought of.*Scotch.*

2858 Quarrels are really began, but with difficulty ended.

2859 Quarrels could not last long, were but prudence on one side.

2860 Quench all immoderate desires.

2861 Quench not hope; for when hope dies, all dies.

2862 Questions in jest no serious answers need.

2863 Quick at meat, quick at work.

2864 Quick wits are generally conceited.

2865 Quick landlords make careful tenants.

2866 Quick promisers are commonly slow performers.

2867 Quick resentments are often fatal.

2868 Quick returns make rich merchants.—*Scotch.*

2869 Quickness and precision are the life and essence of business.

काढी चिलखत, मग दावी हिंमत. अ० अभयाविणा, हिंमत
खरी जाणा.
घाईप्रमाणें, घोडा फेकणें. अ० कामाप्रमाणें, स्वतः वागणें.
जिव्हा स्वाधीन ठेवणें, व्यर्थ बकवा न करणें.
चुलींत बोट घालणें, कपाळास बोल लावणें.

शांतीनें आणि धीरपणें, अति क्रोध शांत करणें.

वस्तु देखिल्यावांचून, नको वर्णूं तिचा गुण.
आरंभीं कज्जा करती, निवारितां कष्टी होती.
एक शहाणा असता, दुजा कज्जा न चालविता.

अमित इच्छा न धराव्या, आपुले अंगीं जिरवाव्या.
आशा मेल्यावरी, कांहीं नराहे माघारी. हिं० जबलग सास,
तबलग आस.
मस्करीनें प्रश्न ऐकावे, त्याचें उत्तर तैसें द्यावें.
खाण्यास झराझर, कामास सरासर.
तीव्र बुद्धीचे प्राणी, बहुधा अभिमानी.
घरधनी खडखडीत, बिऱ्हाडकरी हुशारींत म्ह० राऊत असे
खरखरा, तर घोडा चाले तुरतुरा.
उतावळीनें कबूल करणारे, ते विलंबानें सिद्धीस नेणारे.
शीघ्र कोपासी येती, प्राण घातक होतीं.
करतां रोख वेव्हार, सधन होती सावकार.
त्वरा आणि ठासपण, हे दोघे कामाचे प्राण.

2870 Quiet persons are welcome every where.

2871 Quietness and peace flourish where justice and reason govern.

2872 Quit not certainty for hope.—*Scotch*. See No. 2434.

---

# R.

2873 Rage robs a man of his reason, and makes him a laughing-stock.

2874 Raise no more spirits than you can conjure upon.

2875 Rapacity is the offspring of avarice.

2876 Rash judgment makes haste to repentance.

2877 Rashness is the fruitful parent of misfortunes.

2878 Rather confess ignorance than falsely profess knowledge.

2879 Rather go to bed supperless, than rise in debt.

2880 Rather pay the money out of your pocket than become security.—*Oriental*. See No. 331.

2881 Rather purchase by pursuation than to enjoy by violence. See No. 2844.

2882 Ready money is ready medicine.

2883 Ready money will away.

2884 Real friends are not easily set by the ears. *Oriental*.

2885 Rear and nourish with kindness, but chastise with severity.—*Oriental*.

2886 Reason governs the wise man, and cudgels the fool.

सभ्य जाती जेथें, होती पूज्य तेथें.
न्याय बुद्धि ज्या गांवीं चालतीं, तेथें शांति स्थिरता नांदतीं.

हातींचें सोडावें, पळल्याशाठी न लागावें.

क्रोध बुद्धीते चोरितो, दुसऱ्याचे हांसें करितो.

जेवढी असती शीतें, तेवढी उठवी भुतें अ० सामर्थ्याप्रमाणें, कार्य उरकणें.
अपहार बुद्धि, ती लोभाची वृद्धि.
अविचारें न्याय करी, पश्चाताप पावे तरी.
घाबरेपण, तें अरिष्ट जाण.
न जाणत ऐसे स्पष्ट बोलावें, बोलून लबाडींत न पडावें.

उपवाशी जाऊन निजावें, कर्ज भरीत न उठावें.
जामीन न होइये, गीरोका दिजीये. म० गांठचें द्यावें, जामीन न व्हावें.
समजुतीनें घेणें तें खरें, बळात्कारानें तें नाहीं बरें.

हातीं रोख पैसा, औषधी सरसा.
रोख पैका तरीं, नाहीं राहत घरीं.
काठी मारितां पाण्यांत, पाणी दोहों ठिकाणीं न होत. अ० खरे मित्र असती, कधीं न तुटती.
सोनेका निवाला खिलाना, औरशेरसे नजरोसें देखना. अ० मुलांस खाण्यापिण्याचे लाड करणे, विद्येविषयीं धाकांत ठेवणें.
बुद्धि शाहाण्यास चालविती, मूर्खास छडी मारिती.

2887 Reason is frequently more persuasive than gold itself.

2888 Reason is the key that locks the gate of knowledge.

2889 Reckless youth makes rueful age.—*Scotch.*

2890 Recklessness is the parent of misery.

2891 Reconcile enmities, and cement friendships.

2892 Refuse the favors of a mercenary man.

2893 Refrain not to speak, when by speaking you may do good.

2894 Regal honors have regal cares.

2895 Religion and language we suck in with our milk.

2896 Religion is best understood when most practised.

2897 Religion is the ground-work of salvation.

2898 Religion is the best armour but the worst cloak.

2899 Religious contention is the devil's harvest.-*French*

2900 Remember always your end, and how that lost time never returns.

2901 Remember to assist the distressed.

2902 Remember your duty to God, your neighbour, and yourself.

2903 Remembrance of past pleasures augments present pain.

2904 Remove an old tree, and it will wither to death.

2905 Remove not the old land-mark; and enter not into the fields of the fatherless.—*Scriptural.*

2906 Repentance after base action is the salvation of life.

सुवर्णापेक्षां अधिक, बुद्धि काम करी देख.

बुद्धीस आहे ऐशी शक्ति, ज्ञानास ही बंद करिती.
बेपरवा मुलगा, होईल दांडगा.
बेपरवेपणा, तो दुःखाचा जाणा.
शत्रुत्व मोडा, मित्रत्व जोडा.
लाभलोभी याचा आभार, नको घेऊं अंगावर.
बोलतांना कल्याण होणें, तें बोलणें सोडून न देणें.

राजपदवी असतां, राज्याची वाहे चिंता.
धर्म आणि भाषा, दोन्ही प्रिय पुरुषा.
धर्म चांगला जाणतो, तो धर्मातें आचरतो.
धर्माचा जो पाया, योग्य संसारीं तराया.
उघडा धर्म तारक, झांकला तो मारक.
धर्माविषयीं भांडण, तेंचि दुष्टाचें साधन.
अघाडीचा गेला वेळ, पिछाडी तरी सांभाळ.

दैवानें जो पीडित, त्यास करा बा मदत.
ईश्वरी मानवी सेवा, याचें स्मरण ठेवी बावा.

मागल्या मौजेचें स्मरण, तेणें वाढतें दुःख जाण.

जुनें झाड उपडून लावें, तर तें तात्काळ मरण पावे.
सारून आपली शिव खूण, घेऊंनये अनाथाची जमीन सं० नापसारय
भूमेस्वं मानचिन्हं पुरातनं, पितृहीनस्य क्षेत्रंच व्ययानैव
प्रविश्यतां.
पश्चात्ताप पाप कर्मांतीं, करी जीवाची बा मुक्ति.

2907 Repentance cannot be sincere, if not accompanied with reformation.

2908 Repentance comes too late when all is consumed.

2909 Repentance is the whip for fools.

2910 Report is a quick traveller but an unsafe guide.

2911 Reproach not the unhappy, for the hand of God is on them.

2912 Reprove mildly and correct with caution.

2913 Reprove thy friend privately; commend him publicly.

2914 Reputation is often got without merit, and lost without fault.

2915 Reputation is the darling of human affection.

2916 Reputation serves to virtue, as light does to a picture.

2917 Require not of any man that which is beyond his ability.

2918 Respect a man for his worth and not for his apparel.

2919 Respect a man, he will do the more.

2920 Resist a temptation till you conquer it.

2921 Resist not the laws; they are safe guard of the people.

2922 Resist vice at the beginning and you will conquer it in the end.

2923 Restore faithfully what is committed to thy trust.

2924 Restraint from ill is the best kind of freedom.

2925 Revenge dwells only in little minds.

2926 Revenge, however sweet, always costs more than it is worth.

कोणी सुधारला नाहीं, त्याचा पश्चात्ताप खोटा पाही.

सर्व विषय सरून जाणें, मग पश्चात्ताप येणें.
मूर्खाते पश्चात्ताप होतो, तो चाबुकापरी लागतो.
आवई लौकर येती, पण खरी नसती.
छेडूंनये अभाग्यांसीं, ईश्वर संभाळतो त्यांसी.

सौम्यतेनें खोडणे, ताकिदीनें छेडणें.
मित्रा एकांतीं दूषण, उचित चौघांत भूषण.

अयोग्यतेनें प्रतिष्ठा मिळविती, ती अपराधाविना जाती.

प्राणिमात्राची हो प्रीति, आहे प्रतिष्ठे वरती.
सदाचरणीं प्रतिष्ठा शोभती, जैसी प्रभा चित्रावरती.
सामर्थ्य नाहीं ज्याशीं, मागूं नये त्यापाशीं.

मानी पराक्रमावर, नच पोशाकीं आदर.
आदरमान करी, होईल तुला तरीं.
मोह जिंकितो तोंवरी, मोहातें दूर धरी.
कायदा अमान्य नकरणें, सर्व लोक रक्षण तेणें.
अधी दुर्गुण सोडावा, मग त्यास जिंकावा.

विश्वासावर ठेवावें, विश्वासानें मागें घ्यावें.
वाईट कर्मा नाचरावें, मग सदा मोकळें राहावें. पु० वाईटापा-
सून अटक, ती तो चांगली मोकळीक.
हलके मनाचे प्राणी, सूड वसे त्यांचे मनीं.
सूड घेतां गोड वाटे, परिणामीं कष्ट मोठे.

2927 Revenge in cold blood is the devil's own act and deed.

2928 Revenge often punishes itself.

2929 Reverence the aged, and treat your juniors with kindness.

2930 Reverence your superiors.

2931 Reward is for work, reaping is to the sower. *Oriental*

2932 Rewards and punishments are the basis of good government.—*Italian.*

2933 Reynard is still Reynard, though he put on a cowl.

2934 Rich men and fortunate men, have need of much prudence.

2935 Rich men depend on the poor, as well as the poor on them.

2936 Rich men feel misfortunes that pass over poor men's heads.

2937 Rich men have no faults.

2938 Rich men's spots are covered with money.

2939 Riches abuse them who know not how to use them.

2940 Riches beget riches; poverty, poverty.

2941 Riches gotten with craft, are commonly lost with shame

2942 Riches have wings.

2943 Riches, like manure, do no good till they are spread.

2944 Riches may be wasted, honor lost but virtue is immortal.

2945 Riches may at any time be left, but not poverty.

2946 Riches serve a wise man, but command a fool.

थंड काळजानें सूड घेणें, हें तो दुष्टाचें आचरणें.
सूड आपुले हाती, शासन पावती.
वडिला पूज्य मानावें, धाकट्यां ममतेनें वागवावें.

श्रेष्ठ जन, पूज्य मान.
दळील तो भरील, करील तो पावेल.
बक्षिस आणि शासन, हें चांगलें राज लक्षण.

वाघ्याचा झाला पाग्या, येळकोट राहीना, पूर्व स्वभाव जाईना.
श्रीमंत भाग्यवान, यांस असावें ज्ञान.

गरीब आणि धनिक, परस्परें त्यांची कुमक.

गरीबा अरिष्टें न वाटतीं, श्रीमंता आल्या जाचतीं.

द्रव्यवानातें, दूषण नसतें.
धनिकाचें लांछन, द्रव्य झाकितें जाण.
द्रव्य व्यय करतां येत नाहीं, त्याजवळ पैका न राही.
द्रव्याला द्रव्य मिळतें, दरिद्राला दरिद्र भेटतें.
कपटानें द्रव्य मिळतें, अवघें कुमार्गानें जातें.

लक्ष्मी नाहीं सर्वदा स्थिर, निघून जाती सत्वर.
द्रव्य फैलावल्यावीण, कधीं वाढत नाहीं जाण. अ० पैका देता घेता ज्यास्त, जैसें शेतास खात.
मान आणि पैका न राहे, सदाचरण काईम पाहे.

संपत्ति सोडूनियां जाती, गरीबी आहे तीच राहाती.
लक्ष्मी शहाण्यां अनुसरती, मूर्खी आज्ञेत वागविती.

2947 Riches, though hard to gain, are still hard to keep.
See No. 1989.

2948 Riches well got, and well used are a great blessing.

2949 Rome was not built in a day.—*French.* See No. 439.

2950 Root up the tree of hypocrisy; but cultivate the seedlings of truth.

2951 Royalty consists not in great pomp, but in great virtues

2952 Rule lust, temper the tongue, and bridle the belly.

2953 Rule the appetite and temper the tongue.

2954 Rule your fancy with your reason, or it will over-rule you.

2955 Run not into ruin with your eyes open.

2956 Run so much as you please, you will only get what God has ordained.—*Oriental.*

---

# S.

2957 Sadness and gladness succeed each other.
See No. 1897.

2958 Sadness is the punishment of the heart; hope, the medicine of distress.

2959 Safe bind, safe find.

2960 Safe is he who serves a good conscience.

2961 Salt cooks bear blame, but fresh bear shame.

द्रव्य मिळवितां आयास, तेवढे रक्षणीं प्रयास.

सन्मार्गी द्रव्य व्यय करावा, तो कल्याण दायक ह्मणावा.
रोम शहराची बांधणी, नाहीं झाली एका दिनी. अ० एकदम
काम सारें, दिवसांत नहोय पुरें.
दंभ वृक्ष निर्मूळ कर, वाढीव सत्याचे अंकुर.

राज्य डाम डौलाचे नसावें, सदाचरण तेथें असावें.

मदन आवरणें, जिव्हा नेमस्त ठेवणें, पोटी कांटे घालणें, तरी
जाणा जिणें धन्य.
क्षुधेस आटोपणें, जिभेस नेमस्त ठेवणें.
बुद्धीनें इच्छा आवरून धरी, नधरतां वावगें करी.

जाणून आगींत उडी, घालतां होईल नासाडी.
धांव धांव जो बेध तिखासो पाव म० जें ब्रह्यानें लिहिलें भा-
ळीं, तें नचुकें कदा काळीं. स० यद्धात्रानिजभालपट्ट-
लिखितं तन्मार्जितुंकःक्षमः॥

सुख दुःखाचा बांधा, जैसा जोड फळाचा सांधा.

खेद मनास शासन, आशा औषधा समान.

बांधलें घट्ट, तर राहें नीट.
जो सत्यानें चालतो, तोचि निर्भय असतो.
जुना स्वयंपाकी होतो आळशी, नवा काम करी शरमेशीं.

2962 Sand forms the mountain, moments make the year.
2963 Sauce for the goose is sauce for the gander.

2964 Save a thief from the gallows, and he'll be the first shall cut your throat.
2965 Say no ill of the year till it be past.
2966 Say nothing of my debts unless you mean to pay them.
2967 Say well is good but do well is better.
2968 Saying and doing are two things.—*French.*
2969 Saying and doing should be but one man's office.
2970 Scandal will rub out like dirt when it is dry.
2971 Scatter with one hand, gather with two.
2972 Seal words with silence, and silence with opportunity.
2973 Seamen are the nearest to death, and the farthest from God.
2974 Search others for their virtues, thyself for thy vices.
2975 Sebastopole was not taken in a day. See No. 2949.
2976 See, listen, and be silent, and you will live in peace. —*Italian.*
2977 Seeing is believing, but feeling is the truth.-*Italian.*
2978 Seek every opportunity to do good.
2979 Seek not for a good man's pedigree.—*Spanish.*
2980 Seek not to reform every one's dial by your own watch.
2981 Seek till you find, and you will not lose your labor.
2982 Secret joys are like an extinguished candle.-*Spanish.*

कणे कणे जमे गिरी, वर्षे पळें पळांतरीं.
जो चारा हंसाचा, तोच असे हंसिणीचा. अ० जें आपल्याला, तेंच दुसऱ्याला.
फांशी देताना चोर सोडी, बसे सोडील्याचे बोकांडीं

वर्ष सरल्यावीण न बोल, वर्षाचें वाईट फळ.
दुसऱ्याचे कर्जाची सोय करावी, तर त्यास त्याची संख्या पुसावी.

काम करणें तें उत्तम, गौरवणें तें मध्यम.
बोलणें आणि करणें, दोन्ही भिन्न जाणणें.
जें बोलावें तें करावें, कृत्य एकाचें असावें.
जाय चहाडी धुवून, जसा मळ पुसून.
दोहाती मिळवावें, एक हाती खर्चावें.
गोष्ट मनांत ठेवणें, समयीं मौन धरणें.

तारवट्याचा मृत्यु हातावर, भक्तीपासून राहाती दूर.

घ्यावा दुसऱ्याचा सद्गुण, आपला त्यागावा दुर्गुण.
सिबास्त पोलचा किल्ला, नाहीं एका दिवसांत घेतला.
पाहून ऐकून स्तब्ध राहे, सहज सुखी तोच होय.

जें पहाणें, तें खरें मानणें, प्रचीत येणें, तें खरें वाटणें.
चांगलें करी, अशी सोय धरी.
उत्तम पुरुषाचें कूळ, शोधू नयें त्याचें मूळ.
आपले घड्याळानें, दुजाचीं न मांडणें. अ० केवळ आपले बुद्धीनें, दुसऱ्या न सुधारणें
शोध केल्या लागे हातीं, श्रम व्यर्थ न जाती.
मनाची खुशी, नकळे कोणाशी.

2983 Secrets are never long-lived.

2984 Secrecy is the soul of all great affairs.

2985 Secrecy is the key of prudence, and sanctuary of wisdom.

2986 Self-conceit is the attendant of ignorance.

2987 Self-denial is the most exalted pleasure.

2988 Self-exaltation is the fool's paradise.

2989 Self-examination is a good medicine for the soul.

2990 Self-interest is the fruitful source of disputes.

2991 Self-interest is the rule; self-sacrifice the exception.

2992 Self-love is the greatest flatterer in the world.

2993 Self-love is the mother of vanity.

2994 Self-praise is the ground of hatred.

2995 Self-preservation is the first law of nature.

2996 Seldom seen, soon forgotten. See No. 2681.

2997 •Selfishness is the root and origin of all monopolies.

2998 Sell not thy conscience with thy goods.

2999 Sell not virtue to purchase wealth.

3000 Send a wise man of an errand, and say nothing to him.

3001 Send a fool to the market, and a fool he will return again.

3002 Send not for an hatchet to break open an egg with.

3003 Send your noble blood to market, and see what it will buy.

3004 Sensible men show their sense by saying much in few words,

गुह्य नाहीं राहात, झाकून दिवस बहूत.
कारभारीं गुह्य रक्षण, तेंच त्याचें साधन.
गुह्य गुज ही चतुराईची किल्ली, तीच असे बुद्धीची खोली.

धरिला जो अभिमान, तेंचि जाणावें अज्ञान.
मन निरोधन, तेंचि मोठें समाधान.
चढती पायरी, मूर्खा आनंद भरी.
आत्म परीक्षा करी, ती औषधा परी.
आत्म हितातें पाहती, तंटा उत्पन्न करिती.
आत्म हित हा धर्म, आत्म नाश तो अधर्म.
आपले हितातें पहातो, तो तर आर्जवी असतो.
अहंभाव मनीं धरती, पोकळपणा घेउन् उठती.
आत्मस्तुती, द्वेषाची हो जाती.
करी स्वतःचें रक्षण, तो स्वधर्मचि जाण.
क्वचित क्वचित पाहातो, त्याचा विसर पडतो.
आपला स्वार्थीपणा, तो आपले पोटाचा भरणा.
सत्यानें माल विका, सत्य बुडवूं नका.
सोडून सदाचरणातें, मिळऊं नको तूं धनातें.
निरोप शहाण्या हाती, न सुचविता चालवी मति.

मूर्ख पाठवितां बाजारीं, गेला तैसा पाहे माघारीं.

नव्वें जरी छेदहोयीं, कुऱ्हाड घेणें तरीं कायी
वडिलाचे पतीवर, कोणी नाहीं धीरणार. अ० मोठे कुळाचा
वाहती अहंकार, ते न मानावे पुरुष थोर.
थोडें बोलून फार अर्थ, असे शहाणे समर्थ.

3005 Sensual pleasure degrades men below the brute creation.

3006 Serve a great man, and you will know what sorrow is.—*Spanish.*

3007 Serve yourself till your children come to age.*Scotch.*

3008 Service is no inheritance.

3009 Servitude is ever new.—*Oriental.*

3010 Set a beggar on horseback, he'll ride to the devil.

3011 Set a thief to catch a thief.

3012 Set bounds to your passion by reason.

3013 Set not too high a value on your own abilities.

3014 Set the saddle on the right horse.

3015 Setting down in writing is a lasting memory.

3016 Setting the wolf to watch the fold.

3017 Seven hour's sleep make a clown forget his design.

3018 Shake not the credit of others in endeavouring to establish your own.

3019 Shame and disappointment attend sloth and idleness.

3020 Shame may restrain what the law does not prohibit. —*Latin.*

3021 Shameless craving must have shameless refusing. —*French.*

3022 Sharp stomachs make short devotion.—*Scotch.*

3023 She betrays her own disgrace, and then dies for shame.—*Oriental.*

भोग विलासांनीं स्थिति, पशु पेक्षां हलकी होती.

मोठे मनुष्याची चाकरी, करितां दुःख होय भारी.

मुलांचें पालन कर, येती वयांत तोंवर.
नाहीं चाकरीचा वारसा, काम सरल्या न भरंवसा. हिं० नोक-
री अरंडकी जड हैं.
नोकरी नित नवी. म० नित्य काम, नवें जाण.
भिकाऱ्या प्राप्त होतां घोडी, मरे तोंवरी करी दौडादौडी. हिं० अ-
नोखिके हाथ कटोरी, पानी पीपी मुही पदोरी.
चोराचें पाउल, चोर शोधील. हिं० चोरकों चोरही, पहच्याने.
स्वबुद्धि बळानें, क्रोध आवरणें.
आपले सामर्थ्यावर, उडूंनको कधीं तर.
पाहून जीन घाली तरी, ज्याचे आहे त्यावरीं. अ० सामर्थ्याप्र-
माणें, जड कोणास घालणें. पु० अपराधाप्रमाणें, दूषण ठेवणें.
लिहून ठेवणें, कार्यीम रहाणें. गु० एक लखीया, सो बकीया.
मेंढवाडा रक्षण करितां, अपाय लांडगा ठेवितां.
जोकीं बहु निद्रा घेतो, कार्य नाश त्याचा होतो.
दुसऱ्याच्या पतीस लावून धक्का, आपली पत स्थापूं नका.

आळस आणि सुस्ती, लज्जा निराशा आणती.
शास्त्र युक्त करणें, त्याची लज्जा नधरणें.

लज्जा सोडून ज्यापाशी मागणें, त्याणें निर्लज्ज होऊन न देणें.

फार भूक लागती, थोडी भक्ति करिती.
आपनी रान खोले, और अपही लाजू मरे.

3024 She came to be entertained, she was set down to grind.—*Oriental.*

3025 She loves the poor well, but cannot abide beggars.

3026 She pushes a large pestle where a needle can hardly pass.—*Oriental.*

3027 She shews many more airs than graces.

3028 She that hath an ill husband shews it in her dress.

3029 She wanders all night in the forest, and when morning comes, is afraid of a crow.—*Oriental.*

3030 She who is born a beauty is half married.

3031 She who is born handsome is born married.*Italian.* See No. 3030.

3032 She who studies her glass neglects her heart.

3033 Shew me a liar, and I'll shew you a thief.—*French.*

3034 Shew not to all the bottom of your heart.

3035 Short and sweet.

3036 Short pleasure, long lament.—*French.*

3037 Short reckonings make long friends.—*Italian.*

3038 Shorter is a draught than a tale.—*Gaelic.*

3039 Shut not your door against the distressed.

3040 Sickness is felt, but health not at all.

3041 Silence is best.—*Oriental.*

3042 Silence is consent.—*Italian.*

3043 Silence is the wisdom of a fool, speech of a wise man.

3044 Silence is a gift without peril, and a treasure without enemies.

आवि मलवा, तो बेसाडी दलवा. अ० आली मेजवानीला, तर-
लावली कामाला.

गरीबाची ममता करी, याचक उभे न ठेवी दारीं. अ० डौल
घालणें, धर्म न करणें.

जहां सूइ नही जाती, वहां मूसल चलाती है. अ० अल्प का-
र्य नाहीं होत, मोठे कामीं करी बेत.

बहु नखरे थोडे सद्गुण, असें स्त्रीचें लक्षण.

कळे वाइट पति, स्त्रीचा पोषाका वरतीं.

सगरी रैन बंन बंन फीरी, भोर भयी कव्वेसें डरी. अ० ज्या
जार कर्मीं स्त्रिया असती, त्या अन्य प्रकारें समजाविती.

रूपें सुंदर जन्मती, ती लवकर वराडती.

अति सुंदर जन्मायेती, तिजवर उड्या पडती.

जिचें ध्यान आरशांत, तिचें चंचळ चित्त.

लबाड तोचि चोर, त्यांत नाहीं फार फेर.

आपले मनांतील गोष्ट, नको करूं सर्वां प्रगट.

थोडक्यांत करावें, गोड वाटावें.

थोडें सुख, मोठें दुःख.

थोडी देव घेव करिती, ते मित्र बहु दिन टिकती.

थोडक्यांत खुबी, गोष्ट असतां लांबी.

प्राणी विपत्तींत पाहावा, त्याचा अव्हेर न करावा.

दुःखणें येतां शरीरीं चैन नाहीं, समाधान असतां नकळे कांहीं.

मबसें भले चूप. सं० मौनं सर्वार्थ साधनं.

बोलता उत्तर नकेलें, ह्मणजे तें खरे झालें.

मौन तें मूर्खाचें शहाणपण, बोलणें तें शहाण्यातें ज्ञान.

मौन हें ईश्वरी दत्त, संकट शत्रु निवारीत.

3045 Silence is wisdom, when speaking is folly.

3046 Silence seldom doth harm.

3047 Silent deeds are better than unprofitable words.

3048 Silent man, like still waters, are deep and dangerous.

3049 Silent waters are seldom shallow.

3050 Silk and satins put out the fire in the kitchen.

3051 Simplicity of character is the natural result of profound thought.

3052 Simplicity of intention is the source of pure morality.

3053 Simplicity of life and manners produce tranquility of mind.

3054 Sin and sorrow are inseparable companions.

3055 Sin blinds the eyes of the wicked, but punishment opens them.

3056 Sin is sin, whether it be seen or no.

3057 Sin is sweet in the beginning but bitter in the end.

3058 Since thou art not sure of a minute, throw not away an hour. See No. 469.

3059 Sincere friendship is the excellence of human nature.

3060 Sincerity is the parent of truth.

3061 Sing his praise who feeds you- *Oriental.* See No.2783.

3062 Sins and debts are always more than we think them to be.

3063 Sit in your place, and none can make you rise.

3064 Six grains of rice and nine skins of water.- *Oriental.*

3065 Slander always leaves a slur.

मौन धरतां दिसतें ज्ञान, बोलतानां होय अज्ञान.
मौनापासून काहीं, उपद्रव होत नाहीं.
करून दाखविणें, व्यर्थ शब्द न बोलणें.
अबोलका दिसतो, तो खोल घातक असतो.
स्थिरपणाचा ओहळ, असतो क्वचित उथळ.
घालतां उंच पोशाखाशी, ठेवी बायको मुलें उपवाशी.
दिसे साधे पणाचा, तो गूढ असे मनाचा.

इछा सरळपणाची, वाट शुद्ध ती नीतीची.
साधा संसारांत, तो शांत मनांत.

पाप आणि दुःख, दोघे सोबती देख.
दुष्टाचे नेत्र झांकी पाप, दंड उघडवी आपे आप.

कोणी पाहिलें न पाहिलें, तरी पाप केले तें घडलें.
पाप गोड तें आगमीं. कडू वाटतें निर्गमीं.
पळाचा नाहीं भरवसा, व्यर्थ न घालवी तासा.

अकृत्रिम मित्रभाव, तो जाणा उत्तम स्वभाव.

अकृत्रिमता, ती सत्याची माता.
जिसका खावे, उसिका गावे.
पाप आणि ऋण, दुणें अंतःकरणीं आण.

आपल्याठायीं बसूं जाणें, त्यास ऊठ कोण ह्मणें.
छ चावल और नव पखाल पाणी. अ० किंचित करणें, बहु दाखविणें.
निंदेचेयोगे, थोडा डाग लागे. ह्म० मातीवरी शेण पडे, माती घे-
ऊनिया उठे.

3066 Slander offends the living, and preys upon the dead.

3067 Slanderers are the devil's bellows, to blow up contention.

3068 Sleep and idleness are enemies to learning.

3069 Sleep without supping, and wake without owing. See No. 555.

3070 Sloth, by bringing on diseases, absolutely shortens life.

3071 Sloth, like rust, consumes faster than labor wears.

3072 Sloth makes all things difficult, but industry all things easy.

3073 Sloth wears out the body, while it corrodes the mind. See No. 326.

3074 Sly knavery is too hard for honest wisdom.

3075 Small faults indulged are little thieves, that let in greater.

3076 Small griefs are loud, but great ones are mostly silent.

3077 Small matters win great commendation.

3078 Small rain fills a pond at last.*Oriental.* See No. 2200

3079 Small rain lays a great dust.—*French.*

3080 So got, so gone.—*Spanish.*

3081 So live and hope as if thou would'st die immediately.—*Latin.*

3082 So many men, so many minds.—*French.*

3083 So much of passion, so much of nothing to the purpose.

चाहडी जित्या टोचती, मेल्या पाप घेती.
चाहाड दुधाचे हो भातें, ते फुंकती तंव्यातें.

निद्रा आणि आळस, हे तो शत्रु विद्यांस.
बरें उपवासी निजणें, कर्जा शिवाय उठणें.

आळस तो रोग जाण, तेणें जीवित्व होय क्षीण.

आळसानें शरीर हीन, जंगानें लोखंड क्षीण.
अवघे सोपे उद्योगानें, सर्व कठीण आळसानें.

आलस्य शरीर घटवितें, मनास ही खात असतें.

मतलबी ठकपणा, शहाण्यापासून न घडे जाणा.
अल्प गुन्हा अल्प चोरी, करूं दिल्या मोठी करी.

अल्पदुःखी मोठा खेद, मोठीं दुःखें होतीं बंद.

थोडा विषय असतो, स्तव त्याचा बहु होतो.
फूये फूये तलाब भरे. म० थेंबे थेंबे तळें भरे.
थोडा पाउस पडतो, फार धुराळा उडतो. अ० थोडें कार्य करतो, फार बोलून दाखवितो.
जसें आलें, तसें गेलें.
आनायासें व्हावा काळ, ऐसें मागे वेळोवेळ.

एकेका मनुष्या मति, भिन्न भिन्न असती.
जेवढा क्रोध येतो, तेवढा विषय नसतो.

3084 Soft words hurt not the mouth.

3085 Solitude dulls the thought, too much company dissipates it.

3086 Solitude is the parent of reflection.

3087 Some are active with their hands, some with their tongues.—*Oriental.*

3088 Some are always busy, and never do any thing.

3089 Some are of light weight, and some of little price. —*Oriental.*

3090 Some do first, think afterwards, and repent for ever.

3091 Some are wise, and some are otherwise.

3092 Some rich men are over-valued, though nothing worth. See No 542

3093 Some spare at the spigot, and let at the bunghole. See No. 2718.

3094 Sometimes the days and sometimes the nights are longer.

3095 Sometimes words hurt more than swords.

3096 Soon hot, soon cold.

3097 Soon ripe, soon rotten.

3098 Soon well, long ill.

3099 Sorrow and an evil life maketh soon an old wife.

3100 Sorrow and ill weather cometh unsent for.—*Scotch*

3101 Sorrow, carried to excess, destroys both the mind and body.

3102 Sorrow is good for nothing but sin.

3103 Sorrow is soon enough when it comes.—*Scotch.*

बोलतां मंजूळ वाणी, मुख न दुखें आणी.
कल्पना काळजीनें मंद होती, बहु समुदायानें घाबरती.

चिंतेपासून मनन, होत असतें उत्पन्न.
किसका हाथ चले, किसकी जबान चले.

कामांत चूर दिसती, कांहीं करित नसती.
कोयी तोलों कम, कोयी मोलों कम.

मनन केल्याशिवाय करिती, शेवटीं पश्चात्ताप पावती.
कांहीं असती शहाणे, कांहीं वागती मूर्खपणें.
धनाढ्याची द्रव्य संख्या, त्यापेक्षा अधिक आख्या. गु० सोये सहसर गणाय.
थोडेंथोडें वांचविती, एकवेळींच घालविती.

कभी दिन बडे, कभी रात बडी अ० कधीं द्रव्यवान गरीबीतें पावतीं, कधीं गरीब द्रव्यवान होती.
कठीण तरवारीचा मार, त्याहून शब्दाचा तो फार.
लवकरी तापे भांडे, तें लवकरी होय थंडें. अ० अति प्रीति जडती, लवकर तुटती.
लवकर जें पिकतें, लवकरी तें नासतें.
लवकर होय बरा, तो पुन्हा दुखणाईत खरा.
दुःख असें वाईट संसारीं, त्या योगें स्त्री होय म्हातारी.
दुःखणें आणि वाईट हवा, न बोलाविलां येतीं धावा.
अतिशय शोक करतो, देह मनाचा नाश होतो.

दुःख वाईट पाप आहे; मनी विचारुनि पाहे.
दुःखाची जी स्वारी येती, पुरे पुरे जीवा होती.

3104 Sorrow will pay no debt.

3105 Sound not the vain trumpet of self-commendation.

3106 Sour grapes, as the fox said when he could not reach them. See No. 2330.

3107 Sow good works, and thou shalt reap gladness.

3108 Spare superfluities, to provide necessaries.

3109 Spare to speak, and spare to speed. See No. 876.

3110 Spare well and spend well.

3111 Spare when you are young, and spend when you are old.

3112 Speak little and to the purpose, and you will pass for somebody.

3113 Speak not, rather than speak ill.

3114 Speak the truth and shame the devil.

3115 Speak well of your friend, of your enemy say nothing.

3116 Speak what you think but not always all you know.

3117 Speak when you are spoke to; come when you are called.—*Latin.*

3118 Speaking without thinking is shooting without taking aim. See No. 3090.

3119 Speech is the gift of all, but the thought of few. —*Latin.*

3120 Speech is the picture of the mind.

3121 Spend not, where you may save; spare not, where you must spend.

3122 Spend the day well, and you will rejoice at night.

3123 Sport not with life, nor for death.

दुःख धरून बसला, कर्ज फिटेना त्याचे बाला.
आत्म स्तुतीचा बांका, नको फुंकूं फुका.
द्राक्षा उंच मांडवावरीं, कोल्हा अंबट ह्मणून फिरी. अ० वस्तु
हातीं लागत नाहीं, मग खोड ठेवी कांहीं.
भला करेगा, भला पावेगा.
उरला पदार्थ वाचवी, पुढले साहित्या लावी.
कांहीं बोलण्या विना, काम न होय जाणा. हिं० बिन रोये ल-
डकाभी, दूध नही पाता.
वाचवून ठेवावें, चांगलें खर्चावें.
तारुण्यांत संग्रह जरी, व्यय जरा आल्या करी.

कामापुरतें बोलावें, शहाण्यांत खपावें.

स्तब्धपणानें राहणें, पण कडु न बोलणें.
खरें बोलावें, खोट्या लाजवावें.
चांगलें ह्मणावें मित्राचें, कांहीं न बोलावें शत्रूचें.
मनन कर तेंच बोल, दुसरे बोलूंनये बोल.
बोले त्याशीं भाषण करी, बोलावी त्या जाय घरीं.

बोलणें जें मननावीण, बार जैसा निशाण हीन.

बोली सर्वांस येती, कल्पना थोडक्यां असती.

मनुष्याची उक्ति, मनाची ती मूर्ती.
कार्या समयीं खर्च लावी, एरवीं संभाळून ठेवी.

चांगला घालीव दिवस, सर्वां होईल उल्हास.
जीव मरणाच्या चेष्टा, करतांना पावे अपेक्षा.

3124 Spend and be free, but make no waste.

3125 Stand in awe of thine own conscience.

3126 Stars are not seen by sunshine.

3127 Stay no longer in a friend's house than you are welcome.—*Scotch.*

3128 Steal a penny, steal a pound. See No. 1542.

3129 Step by step, one goes a long way.

3130 Step after step the ladder is ascended.

3131 Stick your opinion on no person's sleeve.

3132 Storms in the conscience will always lodge clouds in the countenance.

3133 Straight trees have crooked roots. See No. 2279.

3134 Strangers are not to be trusted.

3135 Stretch your legs according to your coverlet. See No. 749.

3136 Strike while the iron is hot.—*Italian.*

3137 Strive not against a person who has never injured you.

3138 Strive not to vie with the powerful.

3139 Strong minds are superior to bad fortune.

3140 Stubbornness and obstinacy are the effects of a shallow understanding.

3141 Study begetteth study, and sloth increaseth sloth.

3142 Study enhances prosperity, and alleviates adversity.

लागेल तितकें खर्चावें, व्यर्थ खर्च न करावें.
आपले सत्यानें, सदा भिऊन चालणें.
उगवतां सूर्यकिरणें, नदिसतीं तारागणें. अ० थोराचे तेजाखा-
लीं, गरीबें जातीं लपलीं.
सत्कार आहे जोंवरी, राहे मित्राचे घरीं.

एका पैशाची चोरी, करील रुपयाची तरी.
पाऊल पाऊल टाकतां, बहु होती सरता.
पायरी पायरीनें, शिडी चढणें.
दुसऱ्याचे अंजूळींत, नको राहूं पाणी पीत.
ज्याचें मन भयाभीत, त्याचें मुखीं काळिमा नित्य.

सरळ झाडाला मुळ्या, येती वांकड्या तिकड्या.
परक्या मनुष्यावरी, अति विश्वास न धरी.
अंथरूणा प्रमाणें, पाय पसरणें.

लोह जोवरी आहे उष्ण, करी तोवरी ताडण. अ० मर्जी थो-
राची पाहून, कार्य घे आपुलें साधून.
जो अपकारी नाहीं, त्या छेडून न पाही.

समर्थी बराबरी, करण्या न यत्न करी. गु० लांबा साथे टुको
जीयाय, मरे नही पण मांदो थाय.
मनाचा खंबीर, तो विपत्तींत गंभीर. सं० विपदि धैर्य.
अडेलपण हट्टीपण, अल्प बुद्धीचें लक्षण.

अभ्यासे अभ्यास वाढतो, आळसानें आळस येतो.
वाढे अभ्यासे संपत्ति, तेणें कमी होय विपत्ति.

3143 Study of science and literature makes a man rich.
—*Oriental.*

3144 Study mankind as well as books.

3145 Study to be worthy of your parents.

3146 Study wisdom and you will reap pleasure.

3147 Subdue your passions, and every duty of life will appear you easy.

3148 Success depends on our using proper means.

3149 Success is the child of confidence and perseverance.

3150 Success makes a fool seem wise.

3151 Such a welcome, such a farewell.

3152 Such as are careless of themselves can hardly be mindful of others —*Greek.*

3153 Such as boast much usually fail much.

3154 Such as do nothing are always in the way of mischief.

3155 Such as give ear to slanderers are worse than slanderers themselves.—*Latin.*

3156 Such as the tree is, such is the fruit. See No. 453.

3157 Such is the government, such are the people-*Italian.*

3158 Sudden joy kills sooner than excessive grief.

3159 Sudden trust brings sudden repentence.

3160 Sue a beggar, and get a louse.

3161 Suffer any thing, but incur not public ridicule.
—*Oriental.*

3162 Sufferings are but the trials of gallant spirits.

जर तुला पाहिजे धन, तर करी विद्या संपादन.

ग्रंथाचा अभ्यास करणें, माणूसपणा शिकणें.
योग्यता वडिलाची, अभ्यासावी साची.
करी ज्ञानाचा अभ्यास, होय सुखभोग त्यास.
कामक्रोधादि जिंकावें, स्वस्थ संसारीं असावे.

चांगले प्रयत्न करावें, आणि यश मिळवावें.
निष्ठा दीर्घप्रयत्न, हेचि यशाचें साधन.
मूर्खाचे शहाणे दिसती, मूर्ख जय जरी पावती.
करी जैसा जो आदर, तैसा त्यास प्रत्यादर.
स्वयें बेपरवा जे राहाती, विरळा लोकांचें ऐकती.

जो बढाई सांगतो, तो तर सर्वदा फसतो.
जे रिकामे असती, ते उपद्रवातें करिती.

जे चहाडखोऱ्याचें ऐकती, ते चहाड्यापेक्षां दुष्ट असती.

जसें झाड, तसें फळ.
यथा राजा, तथा प्रजा.
अतिशय शोक अवकाशानें मारतो, अकस्मात हर्ष त्वरित प्रा-
ण घेतो.
एकाएकी विश्वासतो, पावे पश्चात्तापास तो.
फिर्याद भिकारीयावरी, यूका भिळती केली तरी.
धासून घ्यावें, पण हसून न घ्यावें.

शूरत्वाचि परीक्षा करी, संकटे आल्यावरी.

3163 Sufficiently revenged is he who can pardon his bitterest enemy.

3164 Superior abilities are acquired by long application.

3165 Superstition renders a man a fool, and scepticism makes him mad.

3166 Surgeons should have an eagle's eye, a lion's heart and lady's hand.

3167 Suspect a talebearer, and trust him not.

3168 Suspect the meaning, and regard not speeches.

3169 Suspicions among thoughts are like bats among birds.

3170 Sweep the houses of your friends but knock not at the door of your enemy.

3171 Sweet and sound is the sleep of an industrious man.

3172 Sweet discourse makes short days and nights.

3173 Sweet-meat must have sour sauce.

3174 Sweet water cannot flow from a foul spring.

3175 Sweet words nourish hope, but contempt kills it.

---

# T.

3176 Take a man by his word and a cow by her horns. —*Scotch.* See No. 587.

3177 Take a vine of a good soil, and a daughter of a good mother.—*French.*

3178 Take away fuel, take away flame.

शत्रूवर क्षमा करणें, तोच त्याचा सूड घेणें.

मिळवितां पराक्रम, पडताति फार श्रम.
अधर्मानें ये मूर्खता, वेडेपणा धर्म निंदा करिता.

दृढछाती सूक्ष्मदृष्टी मृदुहस्त जाणें, असी असावीं शस्त्रवैद्या-
चीं लक्षणें.
चाहाडखोराचा संशय धरी, विश्वास त्याजवर नकरी.
जाऊं नको भाषणावर, बोलण्याचा अर्थ कर.
कुतर्क मनांत ओंगळ, जसें पक्षांत वाघूळ.

मित्राचें घर झाडावें, परी शत्रुद्वारीं नजावें.

उद्योगी मनुष्य भागे, गाढमूढ निद्रा लागे.
प्रीतिचीं भाषणें चालतीं, रात्रंदिवस लहान वाटती.
गोड पदार्थासवें, अंबटवणी असावें.
खाऱ्या झऱ्यातूनि पाणी, कैसें निघे गोड वाणी.
गोडबोलें उल्हास होतो, धिक्कार शब्दें प्राण जातो.

मनुष्यें धरावीं वचनानें, गुरें धरावीं शिंगानें.

कलम बरें जमीनीतून घेणें, कन्या चांगले कुळांतून करणें.

सरपण काढती, ज्वाळा नाहींशा होती. अ० चाहाड दूर करि-
ती, तर तंटे न लाविती.

3179 Take away my good name, take away my life.

3180 Take care of the pence, and the pounds will take care of themselves.

3181 Take care of minutes, and hours will take care of themselves.

3182 Take no counsel from the mouth of an angry man.

3183 Take the will for the deed.

3184 Take time when time is, for time will away.*Scotch.*

3185 Tales of Robin Hood are good enough for fools.

3186 Talk is but talk; but it is money that buys land. See No. 2785.

3187 Talk of the devil, and his imp appears.

3188 Talk of the war, but do not go to it.—*Spanish.*

3189 Talking too much is a great proof of folly.

3190 Tell me with whom thou goest, and I'll tell thee what thou doest.—*Italian.*

3191 Tell me the company you keep, and I'll tell you what you are.

3192 Tell money after your own father.

3193 Tell not all you know, nor do all you can.—*Italian.*

3194 Tell not thy secrets to thy servant, lest he become your master.

3195 Tell your grievances to a man of feeling.-*Persian.*

3196 Temperance, employment, and a cheerful spirit are the great preservers of health.

3197 Temperance is the best physic.

3615 There are more fools than wise men in the world.

3616 There are many rare abilities in the world, which fortune never brings to light.

3617 There are some teeth to eat with, some to exhibit. —*Oriental.*

3618 There is a devil in every berry of the grape. *Turkish.*

3619 There is a different fame goes about of every man.

3620 There is a remedy for every thing, could we but hit upon it.

3621 There is a scarcity of friendship, but none of friends.

3622 There is a thick mist, so sing as you please. *Oriental.*

3623 There is a tide in the affairs of men, which, taken at the flood, leads on to forune.

3624 There can be no friendship where there is no freedom.

3625 There can be no peace in any state where whisperers and tale-beares are encouraged.

3626 There is frequently a worm at the foot of our flourishing condition.

3627 There is moon-light for a few days, and then it is dark as before. —*Oriental.* See No. 2187.

3628 There is more hope of a fool, than of him that is wise in his own conceit.—*Latin.*

3629 There is more money got by ill means than by good acts.

3630 There is more trouble in having nothing to do, than in having much to do.

शहाण्याहूनि मूर्ख कोटी, असती ह्या जगा पोटीं.
भूवरी असती बहु गुणी, दैवदशा प्रकाशीं न आणी.

खानेके दांत और, देखनेके और. अ० एक बोलावें, दुसरें करावें.

गोड फळीं, लागे अळी. अ० लागतें लांछन, चांगल्यास जाण.
सर्व मनुष्यांची कीर्ति, एक सारखी नसती.
सर्वांस उपाय आहे, जाणता शोधून पाहे.

मैत्रीकीचा असतो तोटा, मित्र मिळती फुकटां.
अंधाधुंद, मनहरा गाय. अ० धाक नाहीं शिरीं, व्हावें तसें करी
ओहट भरती समान व्यवहार, सांभाळी द्रव्य भरती आल्यावर.

जेथें मोकळिक नाहीं, ती मैत्री व्यर्थ पाही.

ज्या राष्ट्रीं चाहाड कानघुसे, तेथें प्रजेस सुख न दिसें.

भरभरीचे वेळीं, कीड असती तिचे तळीं.

चारदिनकी च्यांदनी, फेर अंधयरा पाख. म० दोहों दिसाचें चां-
दणें, दोहों दिसाचें नांदणें. गु० चांद सुधी चांदणु.
मूर्ख आशा बहु धरितो, सुज्ञ ती खोटी मानतो.

चांगले कर्मानें थोडा पैका, वाईट मार्गे मिळे बहु देखा.

काम नसता उदास, बहु कामानें आयास.

3631 There is never enough where nought leaves.

3632 There is neither merit nor fault, in letting an ass eat your field.—*Oriental.*

3633 There is no art that can make a fool wise.

3634 There is no better looking-glass than a true friend.

3635 There is no blemish in the nature of God.

3636 There is no concealing pregnancy from the midwife.—*Oriental.*

3637 There is no company like the penny. See No. 3242.

3638 There is no ditch before one's tongue.—*Oriental.*

3639 There is no folly equal to the folly of wickedness.

3640 There is no fool like an old fool.

3641 There is no general rule without an exception.

3642 There is no honor where there is no shame. *Italian.*

3643 There is no joy without alloy.

3644 There is no medicine against death.—*Italian.*

3645 There is no mischief in the world done, but a woman is one.

3646 There is no more faithful nor pleasant friend than a good book.

3647 There is no perfect happiness in the world but in heaven.

3648 There is no physic for false ideas.

3649 There is no quenching of fire with tow.

3650 There is no road to wealth so certain as economy.

3651 There is nosmoke without some fire, See No. 2513.

सामान सिद्ध असें करावें, मेजवानी होऊन उरावें. हिं० इत॰
ना पका, के बासि थका.

गधेने खेत खाया, पापना पुन. म० निर्गुणीयां देणें, पापना
पुण्य तेणें.

मूर्खाचा शहाणा करूं पाहीं, त्यास न दिसे उपाय कांहीं.

मित्र जो खरा, तो केवळ हिरा.

जात खुदाकी, बेअयबहै. अ० ईश्वर मात्र, असे पवित्र.

दाइके आगे पेट कीया छपाना. अ० ज्याचे हातीं काम करवीं,
त्याशीं चोरून न ठेवी.

पैका आहे हातीं, तोच त्याचा साथी.

जबान आगे, खंदक नहीं. अ० जिव्हे पुढे कांहीं, आटक नाहीं.

दुष्टाई सारखा मूर्खपणा, तसा दुसरा नसे जाणा.

ज्ञात्याच्या मूर्खासारखा, दुसरा नाहीं देखा.

असे जी प्रशस्त रीति, तिजला सोडवण असती.

कांहीं नसें लज्जा जेथें, थोरपणा नाहीं तेथे.

कष्टावीण सुख होत, ऐसें कोठें न दिसत.

औषध नाहीं, मृत्यूस कांहीं.

स्त्रीपासून अपकार, संसारीं होतीं फार.

चांगलें पुस्तकापरीं, संग रम्य न भूवरीं.

मृत्युलोकीं पूर्ण नाहीं, सदा सुख स्वर्गीं पाहीं.

वहमकी, दारू ही नहीं. अ० जे संशय घेती, त्यास उपाय नसती.

तागाचेंहो बुरकूलानें, अग्नि कसा विझवणें.

काटकसरेनें द्रव्य राहातें, दुसरा मार्ग नाहीं त्यातें.

अग्नीशिवाय धूर, नाहीं येत वर.

3652 There is no trusting a man that appears with two faces.

3653 There is no twisting a rope of sand.—*Oriental.*

3654 There is no use in speaking to a stone wall.*Persian.*

3655 There is no worse robber than a bad book.-*Italian.*

3656 There is not a thread in the house, and the blockhead wants a turban.—*Oriental.*

3657 There is not even as much left as would feed a dog.—*Oriental.*

3658 There is nothing that makes a deeper impression on the mind than the misfortune of life.

3659 There is nothing so secret but time and truth will reveal it.

3660 There is the difference of four fingers between seeing and hearing.—*Oriental.*

3661 There is thunder as well as rain.—*Oriental.*

3662 There is tongue under the tongue.—*Oriental.*

3663 There is a vast difference between an old woman and a young princess! —*Oriental.*

3664 There is the world and flattery.—*Oriental.*

3665 There would be no ill language, were it not ill taken.

3666 There would be no great, were there no little ones.

3667 They are all branches of one stock whether small or great.—*Oriental.*

3668 They are birds of the same feather.—*Oriental.* See No. 28.

दुतोंड्याचा विश्वास, कधीं करूंनये खास. गु० बे मोडानी चाकल.

धूलकी रसी, नही बांधी जाती. म० वाळू रगडितां, तेल नये हातां.
मूढास उपदेश करूं पाहीं, तो त्याचे उपयोगीं नाहीं.
वाईट पुस्तक वाचती, व्यर्थ समय घालवती.
घरमे नही नागा, अलबेलामागे पागा. गु० घरना छोकरा घंटि
चाटे, ने उपाध्यायाने आटो जोईये. म० घरांत नाहीं कव-
डी, घेऊं मार्गे शालजोडी.
नबासी रहे न कुत्ता खावें. अ० खाउन नउरे कांहीं, अति ग-
रिबी पाही.
संसाराचें दुःखापरी, नाहीं जाचत अंतरीं.

गुह्य हें कधीं गुप्त नराहे, काल परत्वें प्रगट होये.

दखनेमे और सुन्नेमे, च्यार उंगलका फरक.

मेघ गडगडे, पाऊस पडे. अ० जें बोलावें, तें करावें.
जबान तले, जबान है. अ० दोहो जीभेनें बोलतो, तो ठक असतो.
कहां बुढीया, कहां राजकनीया. अ० मोठ्या गप्पा छाटी, गां-
डीस नाहीं लंगोटी.
दुनयाहै और खुशामदहै. अ० जगीं प्रिय आहे, आजर्व तो पाहे.
भाषा सर्व चांगली असती, वाईट कोणा नलागती.

लहान थोर नसती, तर अवघे सम असती.
एक तवेकी रोटी, कीया छोटी कीया मोटी. अ० एकापासून
संतति, विभागी सारखे होती.
सब एकही ठेलेके बटेहे.

3669 They are dying at the foot of the bur-tree, though the fruit is ripe.—*Oriental.*

3670 They eat the food of one, and sing the praise of another.—*Oriental.* See No. 3061.

3671 They drink the water, then enquire the caste of him who gave it.—*Oriental.*

3672 They have poured oil into their ears.—*Oriental.*

3673 They have returned from the house of God. *Oriental.*

3674 They lade a camel even while he mutters. *Oriental.*

3675 They love too much that die for love.

3676 They may know the workman by his work. *Italian.*

3677 They must hunger in frost, that will not work in heat.

3678 They need much whom nothing will content.

3679 They say so, is half a lie.

3680 They that avoid not small faults, by little and little fall into greater.

3681 They that hide, can find.

3682 They whip the cat if the mistress does not spin. —*Spanish.*

3683 They who give willingly, love to give quickly.

3684 They who slander the dead are like the envious dogs, that bark and bite at bones.—*Latin.*

3685 They who would be young when they are old, must be old when they are young.

3686 Things past may be repented, but not recalled. *Latin.*

पके बडके तले, मरमेवाले है. म० पिकले उंबरांखालतीं, उप-
बासी मरती. अ० आला लाभ हातीं, आळसानें घालवितीं.

खाय किसीका, और गाय कीसीका.

पाणी पीकर, जात पुछतेहै. म्ह० आधी पाणी पिणें, मग जात पुसणें.

कानमे तेलडाल बैठेहै. अ० अर्ज कोणाचा, नाहीं आईकायाचा.

खुदाके घरसें, फिर आये है. अ० ईश्वरा घराहून आला, म्हणति ठक जोशाला.

उंट बडबडा तेही, लादतेहै. अ० गरीब करीं फिर्याद, न जाणें त्याची दाद.

बहू इष्क जो करतो, तो इष्कास्तव मरतो.

कारीगराची माहिती, कामावरून होती.

काम उन्हाळ्यांत नकरती, पावसाळ्यांत भूकें मरती. अ० आली संधी धरावी, कदापि न सोडावी.

तृप्ती नाहीं होत कदां, त्यास बहु असावे सदां.

मोघमांत बोलती, तीच अर्धी लबाडी असती.

अल्प दोष न सोडिती, क्रमे मोठेही करिती.

जे लपून ठेवती, तेच शोधून काढती.

एक अपराध करी, दुसऱ्यावरी रागें भरी.

जे खुसीनें इछती, ते त्वरेनें देती.

मेल्याची निंदा करिती, कुत्र्यापरी व्यर्थ भुंकती.

तरुण म्हातारपणाची इछा धरीती, वृध्द तरुणपणाची उमेद करिती.

गत गोष्टीची याद होती, ती पुन्हा मागें येत नसती.

3687 Things unreasonable are never durable.

3688 Think before you speak, and consider before you promise.

3689 Think before you speak, and before whom you speak.

3690 Think like the wise, but talk like ordinary people.

3691 Think much, speak little and write less.

3692 Think no labor slavery that brings in penny saverly.

3693 Think today, and speak tomorrow. See No 3689.

3694 This world is like a lottery, in which we must expect to meet with unlucky chances.

3695 This day there is no trust, come tomorrow.

3696 This is the ball, and this is the plain.—*Persian.*

3697 Those have a short lent, who owe money to be paid at Easter.

3698 Those who amuse themselves with imaginary prospects may expect disappointment.

3699 Those who are always in trouble, blame fortune. —*Oriental.*

3700 Those who creep through bushes must expect to meet with briars.

3701 Those who close the door of science will ever be in the dark.

3702 Those who do nothing fancy themselves capable of doing every thing.

3703 Those who give life are bountiful, than those who give death.—*Oriental.*

3704 Those who live longest will see most.

हरण केलेला पदार्थ, जवळ नाहीं राहत.
मनन करून बोलावें, विचार करुन कबूल करावें.

कोणास काय बोलावें, तें मनन करून ठेवावें.

मनन करी शहाणपणें, साधारणपणें बोलणें.
पक्केपणीं मनन करी बहूत, बोलणें लिहिणें ठेव थोडक्यांत.
पैका कष्टानें आणी, तें दास्यत्व न मानी.
चांगलें मनांत योजावें, मग बोलणें करावें.
दुनया एक सोडती, लाभालाभ घडून येती.

देयाला नाहीं थार, आड आला शनिवार.
हा झेंडू, हें मैदान. म्ह० हा सूर्य, हा जयद्रथ.
कर्ज काढून करणें सण, होय दुःखास कारण.

आशा धरणें, शेवटीं फसणें.

संकटीं पडती, दैवा बोल लाविती.

जो झाडीतून जातो, तो काट्यानें भरतो. अ० वाईट मार्गानें जातो, सदा संकटीं पडतो.
विद्येतें न दाखविती, अंधारांत ते पडती.

जे कोणी नकरूं शकती, ते सर्व करूं म्हणती.

मारने वालेसे, जिलानेवाला बडा दाताहै. म्ह० मारण्यापेक्षा तारता, समर्थ आहे.
अधीक जीवंत राहाणें, अधीक तमासे पहाणें.

3705 Those who play with edge tools must expect to be cut.

3706 Those who plot mischief, live in fear and die miserable.

3707 Those who strive to keep all, often lose all.

3708 Though all men were made of one metal, yet were they not all cast in the same mould.

3709 Though poverty may bring sorrow, riches create inquietude.

3710 Though the cat winks a while, yet she is not blind.

3711 Though the wolf may lose his teeth, he never loses his inclination.

3712 Though the wound be healed, yet a scar remains.

3713 Though thy enemy seem a mouse, yet watch him like a lion.

3714 Thoughts are blossoms of the mind and words the fruits of desires.

3715 Threatened folks live long.

3716 Three women and a goose makes a market. *Italian.*

3717 Till you shake the tree, the apple will not fall. —*Persian.*

3718 Time and tide wait for no man.—*Spanish.*

3719 Time and words can never be recalled.

3720 Time appeases hatred and assuages grief.

3721 Time impairs what is false, but strengthens what is true.

शस्त्रानें जो खेळतो, तो कापून घेतो.

परघात करूं पाहतो, भयाभीत होऊन मरतो.

सर्व रक्षाया पाहातो, सर्वस्वीं तो घालवितो.
एका धातूने सर्वां निर्माण केलें, पण एका साच्यांत नाहीं ओतिले. अ० केले सर्व प्राणी भिन्न, असतां एका धातूचे जाण.
गरीबी शरीरीं जाचती, श्रीमंती अस्वस्थ ठेवती.

मांजर डोळे झांकती, ती आंधळी नसती. अ० शहाणा उगाच बसतो, आपला मतलब पाहातो.
दंत भग्न होती, इच्छा न जाती. पु० देह म्हातारा होतो, जीव तरणा असतो.
जखम होते बरी, वण राहतसे वरीं. अ० काम होऊन जातें, बोलणें राहातें. म्ह० शिमगा जाय, कवीत रहाय.
शत्रु दिसतो उंदिरा सरी, तरी सावध राहे सिंहापरी.

चिंतन पुष्प मनाचें, शब्द फळ इच्छेचें.

मरण मांगती, फार दिवस वांचती.
बायका भरल्या फार, तेथें जाणावा बाजार.
झाड हालविल्याविण, फळें नपडतीं जाण. अ० श्रम केल्यावाचून, कांहीं होत नाहीं जाण.
काळ आणि ओहटभरती, दोन्ही नाहीं मनुष्या हातीं.
शब्द वेळ निघूनिया जाती, पुन्हा माघारी न येती.
काळें द्वेष थंडावतो, काळें शोक शांत होतो.
काळें खोटें नाश पावतें, काळें खरें सिद्ध होतें.

3722 Time is a file that wears and makes no noise.

3723 Time is so swift of foot that none can overtake it.

3724 Time past never returns; the world does not always bestow pleasure —*Oriental.*

3725 Time will show both friend and foe.—*Oriental.*

3726 Timely blossom, timely ripe.—*Spanish.*

3727 To a bad character, good doctrine avails nothing. —*Italian.*

3728 To crazy ship all winds are contrary.

3729 To a full belly all meat is bad.—*Italian.*

3730 To a jaundiced eye every thing appears yellow. —*Persian.*

3731 To a man of business, knowledge is an ornament.

3732 To apply salt to a wound.

3733 To ask for bread and get a stone.—*Oriental.*

3734 To attain through nature unto nature's God. *Oriental.*

3735 To attempt things beyond our ability is to labour invain.

3736 To be frightened out of one's wits.

3737 To be in hand and glove.

3738 To be on the pond and to come home thirsty. —*Oriental.*

3739 To be proud of learning is the greatest ignorance.

3740 To be every one's friend is to be every one's fool. —*German.*

जातो काळ घासत, नाहीं कांहीं कळत.

काळाचीं जी गती, नाहीं धरवत हातीं.

गया बखत फेर हाथ आता नही, सदा ऐश दवरान दिखाता नही.
अ० गेली वेळ पुन्हा येत नाहीं, जगीं सदा सुख न पाही.

बखत पडे पर जानये, को बैरी को मित. म० जाणी प्रसंगावरी, कोण मित्र आणि वैरी.

हंगामीं झाड फुलतें, हंगामीच फळ पिकतें.

दुर्जना चांगली नीति, नाहीं उपयोगा येती. सं० दुर्जनं सज्जनं कर्तुमुपायो नहि भूतले.

तारुं मुळीं असतां जीर्ण, त्यास वारा विरुध्द जाण. अ० मुळचा अशक्त, त्या कांहीं न पचत.

पोट भरलियावर, अन्न नलागे मधूर. सं० अनभ्यासे विषं शास्त्रमजीर्णे भोजनं विषं.

ज्याना कावीळ येते, त्याना पिवळें दिसतें. अ० दुष्ट असती, त्यांस दुष्ट दिसती.

उद्योग्याशीं ज्ञान, केवळ त्याशी भूषण.

दुःखण्यावर डाग देणें, खिन्न मना दुखविणें.

मंगावे तहीं छीटें, लेआया ईटे. अ० करुंजातां एक, घडूंयेतें अनेक.

सगुणाच्या आधारानें, निर्गुणास पावणें.

आहे जें सामर्थ्य, त्याहून यत्न नको व्यर्थ.

मनांत भीति वसे, पांचावर धारण बसे.

घट्ट मैत्री ठेवणें, संगे संगे वागणें.

तलावपर जाना, और पियासे आना. म० तळें राखणें, प्यासें मरणें.

विद्येचा अभिमान, तें मोठें अज्ञान.

सर्वां दाखवितो मित्रत्व, त्याचे सर्व मानिती मूर्खत्व.

3741 To borrow on usury brings sudden beggary. See No. 1557.

3742 To bring a noble to nine pence, and nine pence to nothing. See No. 1336.

3743 To build a castle in the air.—*Italian.*

3744 To burn day-light.

3745 To call an ass father when it suits one's purpose. —*Oriental.* See No. 2030.

3746 To carry coals to Newcastle.

3747 To carry two faces under one hood.—*French.* See No. 2419.

3748 To cry with one eye and laugh with the other.

3749 To cut the branch on which one sits.—*Oriental.* See No. 2721.

3750 To-day gold, tomorrow dust.—*Danish.*

3751 To-day me, tomorrow thee.—*French.*

3752 To-day is, tomorrow is not.—*Oriental.*

3753 To dig a well after the house is on fire.—*Oriental.*

3754 To dig every day a new well, and drink its water —*Oriental.*

3755 To dine with Duke Humphry.

3756 To dive deep and bring up a potshird.

3757 To eat bread with sugar and win the world with cunning.—*Oriental.*

व्याजु पैका घेणें, तर भिकारी होणें.

रुपया मोडून पावला करणें, ईळा मोडून खिळा करणें.

हातीं कांहीं नसणें, चटक्याचें मांडव घालणें.
व्यर्थ समय आपला घालीवणे, दिवसाचा जैसा दिवा जाळणे.
बखत पडा बांका, गधेकों कहना काका. म० अडला हरी, गाढवाचे पाय धरी.
ज्यागावीं कोळशाची खाण, तेथें कोळसे नेतीं तोटा जाण. अ० बंगाल्यातून मीठ आणणें, पिठी साखर तेथें नेणें.
एका म्यानेंत दोन तरवारी, चालत नाहीं निर्धारी.

एकवेळीं दुःख होणें, दुजे समयीं सुख जाणें.
जीस डगाली पर बैठे, उसीको काटे.

आज आहे सुवर्ण कांति, उद्यां होय तिची माती. अ० कोण दिवस येईल कैसा, नाहीं देहाचा भरंवसा.
आज मला, तर उद्यां तुला.
आज है, सों कल नही.
आग लगे पर, कुवा खोदना. गु० तरस लागे तेवारे, कुवो खोदावें. सं० संदीप्तेभवनेतुकूपखननेप्रत्युद्रमःकीदृशः॥
हरोज नया कुवा खोदना, और नया पानि पिना. अ० नित्य उत्पन्न करित जावें, उदर पोषण चालवावें.
जेवणास जाणें, उपवासी येणें. अ० आशाने जाणें, निराशेनें येणें.
समुद्रांत बुडी मारणें, शंख हातीं लागणें. हिं० मोतीं कारन डुबी मारी, तो शंख लगे हात.
रोटी खाना शकरसें, दुनया खेचना मकरसें.

3758 To err, is human; to forgive, divine.

3759 To escape from vice is a virtue.

3760 To examine a cheap sheep, by lifting up his tail. —*Oriental.*

3761 To expect and not to come; to be in bed and not to sleep; to serve and not to please; are three things enough to kill a man.

3762 To find a mare's nest.

3763 To forget a wrong is the best revenge.

3764 To get milk from a flint.

3765 To give and keep, there is need of wit.

3766 To give little and to promise much.—*Oriental.*

3767 To give one a mouthful of Moonshine.

3768 To give quickly is a great virtue.—*Oriental.*

3769 To go is at one's own option, but to return depends on another.—*Oriental.*

3770 To go through fire and water to serve one.

3771 To have the law in one's own hand.

3772 To have the world in a string.

3773 To have two strings to one's bow.

3774 To hold with the hare, and run with the hound.

3775 To humble a proud man, you must take no notice.

3776 To kill two birds with one stone.

3777 To kill with kindness.

3778 To kiss a sleeping child.—*Oriental.*

3779 To kiss the child for the sake of the nurse.

चूक मनुष्यांत राहे, क्षमा ईश्वरासी आहे.
दुराचरणापासून मोचन, तेंच ह्मणावें सदाचरण.
ससति मेंढी, दूम उठाकर देखना. अ० स्वस्त माल घेणें, तर
चौकसी करणें.
अपेक्षा जयाची हातितें नयेतें, निजावें तरीं झोंपही दूर जाते,
दुजा सेवणें मान्यत्या होत नाहीं, मनुष्यासही वाचवी
तीं न पाही.
सर्वांस माहीती, तें उजेडांत आणती.
कोणी नुकसानी केली, विसरावी त्याच वेळीं.
दगडास पान्हा आणणें, निर्दया सदय करणें.
देणें घेणें रक्षणें, चतुराईनें करणें.
देना थोडा, दिलासा बहुत. म० भरंवसा मोठा, देण्याचा तोटा.
खोटी आशा देणें, चेष्टेंत घालिवणें.
तरत दान, महा पून.
जाना अपने अखत्यार, आना पराय बस. म० जाणें असें
स्वाधीन, येणें पराधीन.
संकटांत उडी घालणें, कोणाचें कल्याण करणें.
कायद्या विरुद्ध करणें, राजभय होय तेणें.
कच्चे धाग्यानें, सर्वांस बांधणें.
एका धनुष्यास दोन दोऱ्या, उपयोगी पडती बऱ्या.
ससा धरणें पोटीं, कुत्र्याचे लागणें पाठी. हिं० मेरि मेरे मुहपर, तेरी ते-
रे मुहपर. माझें मनासारखे मला, तुझे मनासारखे सांगणें तुला.
गर्व हरणें असे ज्याचा, समाचार न घ्यावा त्याचा.
एका दगडानें, दोन पक्षीं मारणें. हिं० एक पंथ और दो काज.
पथ्यांत ममता करणें, आपले हातून मारणें.
सोते लडकेका, मुह चुमना. अ० नमागतां देणें, तो उपकार मानणें.
झुठा खाय मिठेके लालच. अ० लाभाचे आशेने, कष्ट सहन करणें.

3780 To know and not able to perform is doubly unfortunate.

3781 To live from hand to mouth.

3782 To live in the river and be at enmity with the crocodile.—*Oriental.*

3783 To live is a gift; to die is a debt.

3784 To make a cock and bull story.

3785 To make a crow of a feather.—*Oriental.*

3786 To make a hole in the vessel out of which one has eaten.—*Oriental.*

3787 To make a mountain of a mole-hill.—*French.*

3788 To make a portable dish out of coarse materials. —*Oriental.*

3789 To make much about nothing.

3790 To marry an oilman and eat dry bread.—*Oriental.*

3791 To mourn without measure is folly; not to mourn at all, is insensibility,

3792 To nourish a viper in one's bosom.

3793 To overcome pleasure is the greatest pleasure.

3794 To pay one in his own coin:

3795 To play the dog in the manger. See No. 2196.

3796 To prescribe physic for the dead, and advice to the old is the same thing.

3797 To promise, and give nothing, is comfort for a fool.

जाणतो पण सामर्थ्य नाहीं, पूर्ण अभाग्य तो पाहीं.

चालवणें संसार, आपले हातावर.
दरीयामे रहना, और मगरमछसे बैर करना. ह्म० जळांत राहणें, माशासीं वैर करणें. अ० एका ठिकाणीं राहाणें, त्यासीं वैर करणें.
जीवन हें ईश्वरी देणें, मरण हें त्याचें घेणें.
उलट सुलट बोलणें, नाहीं तसें समजवणें.
पिसाचा कावळा करणें, अल्प असतां बहु सांगणें.
जिस बरतनमे खाना, उसमे छेद करना. अ० अन्न ज्याचें खावे, त्याचें उणें काढावें.
होतो पर्वत राईचा, तसा राजाही रंकाचा. सं० रंकं करोति राजानं राजानं रंकमेवच.।।
कोंड्याचा मांडा करणें, वाईट गोष्ट सुधारणें.

डोंगर खणणें, उंदीर काढणें.
तेली खसम करना, और रूखा खाना. अ० थोर अश्रय करणें दरिद्रता भोगणें.
अति शोक धरी तें मूर्खत्व, शोक नकरी तें निर्दयत्व.

सर्प पोटासी बाळगणें, मरणास तयार होणें. हिं० सांप रखे पाल, जीका होगा काल.
मौजा आवरणें, तो संतोष मानणें.
जो निंदा करी, पडे त्याचे पदरीं.
तुला न मला, घाल कुत्र्याला.
उपदेश ह्मातान्यास, जेवीं औषध मेल्यास.

कबूल करून नाहीं देणें, मूर्ख संतोष तो जाणें.

3798 To pull down a mosque for a brick.—*Oriental.*

3799 To pull the beard of one who carries you in his arms.—*Oriental.*

3800 To quake at work, and sweat at meals.

3801 To quarrel with one's bread and butter.—*Oriental.*

3802 To read without reflecting is like eating without digesting.

3803 To reduce a brick house to earth.—*Oriental.*

3804 To rob Peter to pay Paul.—*French.*

3805 To say little, and perform much, is noble.

3806 To seek the evil of a benefactor.—*Oriental.* See No. 3786.

3807 To send one away with a flea in his ear.—*Italian.*

3808 To set one's house on fire and look on at the sport. —*Oriental.*

3809 To set the cart before the horse.—*Italian.*

3810 To show the gallows before they show the town. —*Spanish.*

3811 To sing the same song.

3812 To smile in your face and cut your throat. *Oriental.* See No. 1678.

3813 To starve in a cookshop. See No. 3738.

3814 To strain at a gnat and swallow a camel,

3815 To stumble at a straw, and leap over a block.

इंटके वासते, मसजीद ढलानी. अ० थोडक्या कारणें, मोठा नाश करणें.

जिसके गोदमें बैठे, उसकी दाढी खिसोटे. अ० ज्याणें पालन करणें, त्यास अपाय करणें.

कामांस कांपतो, घाम येईतों खातो. अ० करण्यां एकपट, खाण्यांस दुपट.

वाढलेले अन्ना, अव्हेरी जाणा.

मनन न करितां वाचणें, जसें खाऊन न पचवणें.

इंटका घर, माटी करना. अ० उधळे खर्चानें, दौलतीचा नाश करणें.

अहमदकी पगरी, महमदके सिरपर. अ० एकाचें घ्यावें, दुसऱ्यास द्यावें.

थोडें बोलून बहू करी, भला गृहस्थ तो तरी.

खाल्लया घराचे वासे मोजणें, अन्नदात्याचें वाईट इछिणें.

खातरी करणें, वाटेस लावणें.

घर फुंकना, तमाशा देखना. अ० पैसा उडवणें, मौजा मारणें.

वराती मागे घोडें, व्याह्या मागे पिडें.

कृपा करणें, पण क्रूर बोलणें.

वारंवार तेंच गाणें, मनुष्यास उपद्रव देणें.

तोंडावर साखर, पोटांत कातर. सं० वचस्येकंमनस्येकं.

हलवायाचे दुकानीं राहावें, उपवासीं मरावें.

पहार गिळणें, सुई अडकणें. अ० बहुत करून हातमारणें, थोड्याकरितां फसणें.

ओंडा उडूनिया जाणें, काडीस अडकणें.

3816 To swallow an ox and be choked with the tail.

3817 To take something is better than nothing.-*Oriental.*

3818 To take by the hand and support through life.
—*Oriental.*

3819 To take he understands, but to give he has never learnt.—*Oriental.*

3820 To tell our secret is folly; to divulge the secrets of others is treachery.

3821 To tell the tune upon hearing a string sounded.
—*Oriental.*

3822 To the grave with the dead, they who live to the bread.

3823 To the son of a meal grinder parched grain is a profit. *Oriental.*

3824 To throw pearls before swine. *Spanish.* See No. 1803

3825 To throw the rope after the bucket.

3826 To throw the stone, and hide the hand.

3827 To twist a rope of sand.—*Greek.*

3828 To wait for a dead man's shoes.

3829 To whom you betray your secret, you give your liberty.—*Italian.*

3830 To wipe a person's nose.

3831 To work for a dead horse.

3832 To work for the bishop.—*Spanish.*

3833 To work without pay is better than sitting idle.
—*Oriental.*

हाथी निकल गया, दूम अटक रही. म० निघून गेला हत्ती, सेपुट अडकलें अंतीं.
दगडापेक्षां ईट मऊ. गु० पथर करतां इट कुमली.
जरी हातीं धरणें, जन्मवरी पोषणें. हिं० बाह्री पकडके निभाना.

इल्म सिखा लेनेका, नही सिखा देनेका. ह्म० घेण्याची विद्या येती, देण्याची नकळती.
स्वगुह्य प्रगट करी तो मूर्खपणा, दुसऱ्याचे करी तो घातकपणा.

सुतानें स्वर्गास जाणें, सुमारानें समजणें.

मेल्यासंगें स्मशानीं जावें, जित्यासंगें बसून खावें.
पिसन हारीके पूतको, चबिना लाभ. ह्म० कोल्हा कांकडीस राजी.

डुकरा चारा मोतियांचा, नाहीं कधीं उपयोगाचा. हिं० बंदरके हात नारियेल
हातचे घालवणें, निराश बसणें.
दगड मारणें, हात लपवणें.
दोर वाळूचा बांधणें, असाध्य तें करणें.
जब बाप मरेंगें, तब बेल बटेंगें.
छिद्र सांगे ज्यास, त्याचा होय दास.

तोंडावर हात फिरवणें, कसें करून ठकविणें.
मेल्या घोड्या उपाय, केल्या निर्फळ जाय. अ० काम करणें आशा न धरणें.
उपाध्यास्तव करणें, आशा न धरणें. अ० श्रम करणें, निष्फळ जाणें.
फुकट काम करणें, उगेंच न बसणें. हिं० बैठेंसे, बिगार भली.

3834 Too cheap to be good.—*Persian.* See No. 3760.

3835 Too many cooks spoil the broth.

3836 Too much familiarity breeds contempt.

3837 Too much fear is an enemy to good deliberation.

3838 Too much of one thing is good for nothing.-*Latin.*

3839 Too much prosperity makes most men fools.

3840 Touch pot, touch penny.

3841 Trade and commerce are universal cheating by general consent.

3842 Trade is the mother of money. See No. 805.

3843 Trade knows neither friends nor kindred.—*Italian.*

3844 Train up a child in the way he should go : when he is old, he will not depart from it.—*Scriptural.*

3845 Transactions in business are the touch-stone whereby men are tried.—*Oriental.*

3846 Tread on a worm and it will turn.—*Latin.*

3847 Trees on the river bank perish every now and then.—*Oriental.*

3848 Trees will not grow until you scatter seed.*Persian.*

3849 Trim your sails according to the wind.See No.468.

3850 Troubles spring from idleness and grievous toils from needless care.

3851 True bravery fears no enemies and makes none.

3852 True friends neither flatter nor dissemble.

3853 True friends show themselves inadversity.SeeNo84

स्वस्त माल मिळतो, तो दग्याचा असतो.
सात सुइणी मिळती, विणारिणीचा नाश करिती. अ० एका कामीं बहुजण, लागतां करिती घाण.
जसी नात्याची जवळिक, तसी आदराची कवळिक.
फार भय अंतरीं, काहीं नसुचें तरीं.
अति सर्व कोणतेंही, उपयोगी पडत नाहीं. सं० अति सर्वत्र वर्जयेत्.
बहु धन ज्याचे हातीं, ते बहुधा मूर्ख होती.
लावतां तोंडीं करोटी, पैक्याची वाट लाविती.
उदीम व्यापाराचे अंतीं, रजावंतीनें ठकले जाती.

व्यापाऱ्याचे घरीं, लक्ष्मी वास करी.
सोयरे धायरे, न मानिती व्यवहारें.
मुलास शिकवीत जाणें, त्याच्या वळणा प्रमाणें, तो मोठा झालीयावरी, राहील त्याच पंथावरी. सं० योऽध्वाबालस्य गन्तव्य स्तं तंत्वं परिशिक्षय तेन वृद्धोपि तस्मात् स विमुखो न भविष्यति.
मानस कसनेको, मामीला कसोटीहै. अ० काम वहिवाटल्या अंतीं, मनुष्य परिक्षा होती.
सर्प पुच्छीं पाय पडे, तो उलटून चढे. अ० हलक्यास देतां त्रास, तो घेईल प्राण खास.
नदी किनारे रूखडा, जबतक होय बिनास. अ० जोखमांत पडणें, नाश करून घेणें.
बी पेरल्यावीण, झाड न होय जाण.
जैसा वारा लागणें, तैसीं शिडें लावणें.
रिकामपणापासून बहु श्रम, काळजीनें त्यांचा नाहीं नेम.

शूरा शत्रूची नाहीं भीती, त्यास शत्रूही नहोती.
आर्जवून न भुलवी, तो मित्र खरा भावी.
खरे मित्र विपत्तिकाळीं, दिसून येती तत्काळीं.

3854 True honor can be only purchased by worthy actions.

3855 True praise takes root and spreads.

3856 True valor protects the feeble, and humbles the proud.

3857 Trust no secrets to a friend which, if reported, would bring infamy.—*Greek.*

3858 Trust not a horse's heel, nor a dog's tooth.-*Latin.*

3859 Trust not a new friend nor an old enemy.

3860 Trust not the praise of a friend, nor the contempt of an enemy.—*Italian.*

3861 Truth hath always a fast bottom.—*Gaelic.*

3862 Truth is acceptable to God.—*Oriental.*

3863 Truth is the child of God.

3864 Truth is the daughter of time.—*Italian.*

3865 Truth is the great man's glory and the poor man's stock.

3866 Truth is the measure of knowledge, and the business of the understanding.

3867 Truth is truth to the end of the reckoning.

3868 Truth may be blamed, but shall never be shamed. —*Spanish.*

3869 Truth may languish, but can never perish.·*Italian.*

3870 Truth needs no embellishment.

3871 Truth never fears rigid examination.

3872 Truth refines, but does not obscure.

3873 Truths and roses have thorns about them.

योग्यतेचें काम करीं, प्रतिष्ठाच मिळे तरी.

असतां खरी स्तुति, समूळ विस्तारती.
सत्वधीर दुर्बळ्यां तारी, अभिमान्यां नम्र करी.

गुह्य नसांगें मित्रासी, प्रगट होतां फजित होसी.

घोड्याचीटांच कुत्र्याचादात, विश्वासतां डसे मारी लात.
नवा मित्र जुने शत्रूसी, कदापि न विश्वासी.
विश्वासूनये मित्र स्तुतीसी, मानूंनये शत्रूचे धिक्कारासी.

सत्यमूळ घट्ट, त्यास नाहीं तूट.
साची बात, गोपाल भावे. अ० जें खरें असतें, तें ईश्वरा आवडतें.
ईश्वरापासून, सत्य आहे निर्माण.
सत्याचें सत्य होतें, काळें प्रगटतें.
सत्य तें थोराची कीर्ति, गरीबाची धन प्राप्ति.

सत्य ज्ञानाचें वजन, सत्य बुद्धीचें कार्य जाण.

सत्याचें सत्य होतें, शेवटीं बाहेर पडतें.
खऱ्यांवरी आळ येती, परी नाहींच मानिती.

सत्य मनीं झुरतें, तरी नपावें नाशातें.
सत्य उघडें असतें, असत्य लपून राहतें.
नाहीं खऱ्याला भय, करतां करडा न्याय.
सत्य सुधारून राहातें, मलिन होत नसतें.
सत्यास कांटे देखे, गुलाबी फुलासारिखे.

3874 Two blacks make no white.—*Scotch.*

3875 Two cats and a mouse never agree in one house. See No. 2419.

3876 Two eyes see more than one.—*French.*

3877 Two heads are better than one.—*Greek.*

3878 Two in distress makes sorrow less.

3879 Two of a trade seldom agree.—*French.*

3880 Two sparrows upon one ear of wheat cannot agree. See No. 3875.

3881 Two things ought to be the object of our fear, the envy of friends, and the hatred of enemies.

3882 Two words for yourself and one for another.

---

# U.

3883 Ulcers cannot be cured that are concealed.

3884 Unasked favor demands our gratitude.

3885 Unbidden guests know not where to sit down.

3886 Unbought experience is seldom worth much.

3887 Unchaste language is the sure index of an impure heart.

3888 Unchecked desires often meet irresistible misfortune.

3889 Undaunted minds defy fortune.

3890 Under my cloak I'll kill the king. *Spanish.* See No 3743.

3891 Under the blanket, the black one is as good as the white.

3892 Undertake no more than you can perform.

दोहो काळ्यांचा एक गोरा, कैसा होईल तरी बरा. अ० उडद्दा
माजी काळे गोरे, केवि निवडावे निवडणारें.
एक उंदीर दोघीं मांजरी, नांदत नाहीं एका घरीं.

एका नेत्रापेक्षां दोहोंनीं, अधिक पाहाती जाणी.
एकापेक्षा दोन, चांगले जाण. अ० एकसे दो भले.
दुजाचें दुःख पाहावें, आपलें कमी मानावें.
दोघांचा एक व्यापार, नाहीं चालत हो फार.
एका गव्हाच्या कणसावर, दों चिमण्यांचा नसाहे भार.

मित्र द्वेष आणि शत्रु हेवा, उभय मिश्र भयाचा ठेवा.

आपले हीत करावें, दुसऱ्याचें केलें ह्मणावें.

दुखणें चोरून ठेवणें, बरें नहोय जाणें.
न मागतां जो कृपा करितो, त्याचा मोठा उपकार होतो.
न बोलावितां भोजना आला, बसावें कोठें न सुचें त्याला.
फुकट घेतां उपभोग, अगत्य पडता न उपयोग.
करितां जाण दुर्भाषण, तें वाईट मनाचें लक्षण.

स्वाधीन इछेचे राहाणें, वारंवार पेचांत येणें.
जो धैर्याचा प्राणी, दैवांस तो तुछ मानी.
मनीं मांडे खाणें,मनोरथ पुरवणें.गु० मनमां परणीया,मनमां रांडीया.
पडद्या आड काळें गोरें, दिसतें सारखें सारें.

करवेल तितुकें घेई, अधीक सोडून देई.

3893 Undeserving gifts are generally repaid with ingratitude.

3894 Understanding is the faculty of reflection.

3895 Undutiful children make wretched parents.

3896 Unemployed time is the greatest burden to an industrious man.

3897 Unexperienced men think all things easy.

3898 Unfeeling men in prosperity are sure to be unpitied in adversity.

3899 Unfortunate is he who depends on the favor of another.

3900 Uninvited guests sit on thorns.

3901 Union accomplishes marvellous deeds.

3902 Unkind expressions wound sensitive minds.

3903 Unkindness has no remedy at law.

3904 Unlawful love generally ends in bitterness.

3905 Unless the Lord assist you, all your efforts are in vain.

3906 Unlettered men are not always the most ignorant nor learned men always wise.

3907 Unlucky is the house where the hen crows. See No. 1938.

3908 Unmerited honors never wear well.

3909 Unnecessary delays often ruin the best designs.

3910 Unprincipled men live knaves, and die beggars.

3911 Unreasonable silence is folly.

3912 Unskilful workmen quarrel with their tools. See No 1.

3913 Urbanity and civility are a debt we owe to all men.

अपात्रीं बक्षीस करणें, अनुपकार करून घेणें.

मनन करण्याची शक्ति, ता मनुष्याची मति.
नाहीं सेवा तत्पर जरीं, मायबापा दुःख तरीं.
उद्योग्यासीं रिकामपणा, वाटतो ओझ्यापरी जाणा.

अपरीक्षिताते, सर्व सोपें वाटतें. अ० परीक्षा अंगीं नसते, सर्व त्यास सोपें वाटतें.
भाग्य काळीं दया नये जयासीं, विपत्काळीं बुडूं द्यावा तयासीं.

संसार दुसऱ्याच्या हातीं, त्याची पुरीहो फंबखती.

येती आमंत्रावीण, त्यांस नपुसती जाण.
जेथें जमांत,तेथें करामत. सं० बहूनांचैव सत्वानां समवायो रिपुंजयेत्.
निर्दयत्वाचें भाषण, मना लागतसें जाण.
कोणी अवकृपा करी, त्याची दाद न लागे तरी.
व्यभिचाराचा शेवट,असतो कडवट.
ईश नसे ज्यास सहाय, त्याचे श्रम व्यर्थ जाय.
अनक्षर शहाणे असती, कोठे साक्षर मूर्ख होती.

स्त्रीचे बळ असें जेथें, कल्याण नसें तेथें.

अपात्रीं आदरमान, टिकतांना कठीण.
व्यर्थ खोळंबा पडतो, तो चांगले कामा नासतो.
दुराचारी ठक संसारी वागतो, शेवटीं भिकारी होऊन मरतो.
उगीच मौन धरणें, तें मौर्ख्य जाणणें.
नाचतां येईना अंगण वांकडें, रांधतां येईना ओली लाकडें.
सौजन्य गृहस्थपणा, ठेवणें जनीं हा धर्म जाणा.

3914 Use and practice make men capable of employment.
3915 Use not today what tomorrow may want.
3916 Use pleasures moderately, and they will last longer.
3917 Use the means and trust to God for the blessing.
3918 Usury is the daughter of avarice.

---

# V.

3919 Vacant hours move heavily and drag rust and filth along with them.
3920 Vain and transitory is all worldly glory.
3921 Vain-glory blossoms, but never bears.
3922 Valour can do little without discretion.—*Latin.*
3923 Value thy conscience more than thy gold.
3924 Vanity and presumption ruin many promising youths.
3925 Vanity is the natural weakness of an ambitious man.
3926 Vanity renders beauty contemptible.
3927 Vanity will prove vexation.
3928 Venture a small fish to catch a great one.
3929 Venture not all in one bottom.
3930 Venture thy opinion, but not thyself for thy opinion.
3931 Venture upon nothing till you have well considered the end.

परिपाठ आणि वहिवाट, उद्योगी लोका करी बळकट.
खर्चूनये आहे तें आज, ज्याचे उद्यां आहे काज.
बेताने मौजा करी, त्या चालती निरंतरी.
वारंवार प्रयत्न करी, भार ठेवी देवावरीं.
व्याज खाण्याची रीति, ती लोभाची उत्पति. अ० व्याजीं लोभ धरी, त्याची गति नाहीं बरी.

रिकामी वेळ भारी जाती, मलिनता अंगीं जडती.

जगांत मोठेपणा, तो क्षणभंगूर जाणा.
फुशारकी फुलती, फळास नयेती. अ० फुशारकी करितो, शेवटीं फसला जातो.
मुखत्यारी शिवाय पराक्रम, नाहीं चालत करता काम.
द्रव्यापेक्षा मनीं, सत्य अधिक मानी.
अभिमान आणि अनुमान, तरुण पणीं नासाडीच जाण.

महत्वाची इच्छा आहे, तेथें गर्वाचें लांछन पाहे.
सौंदर्याचा जो मीपणा, सदा तुच्छवत जाणा.
पोकळपणा, तो संताप जाणा.
लहान मछ धरूं जाता, येतो मोठा मग धरता. अ० लहान कामें करिती, मोठे कामीं हिमत येती.
अवघे एका स्थानीं, ठेऊं नये कदा मानी.
उत्तम तें मत द्यावें, परी पुढाईत नव्हावें.
परिणाम पाहिल्याविण, उडी न घालावी जाण.

3932 Vice is its own punishment, and sometimes its own cure.

3933 Vice is the most dangerous, when it puts on the garb of virtue.—*Latin.*

3934 Vice produces misery.

3935 Vice is infamous though in a prince, and virtue honorable, though in a peasant.

3936 Victory is the gift of God.—*Oriental.*

3937 Villains may prosper for a time, but their end is ignomy.

3938 Violence breeds hatred and hatred dissension.

3939 Virtue alone is happiness below.

3940 Virtue and fortune work wonders in the world.

3941 Virtue and happiness are mother and daughter.

3942 Virtue cannot be known but through adversity —*Oriental.*

3943 Virtue dwells not in the tongue, but in the heart.

3944 Virtue is the universal charm.

3945 Virtue is a garment of honor, but wickedness a robe of shame.

3946 Virtue is a jewel of great price.

3947 Virtue is commended by all, but followed by few.

3948 Virtue is of noble birth, but riches take the wall of her.

3949 Virtue is the health and beauty of the soul.

3950 Virtue itself, without good manner, is laughed at.

3951 Virtues all agree, but vices fight one another.

3952 Voluptuous pleasures bring tormenting pains.

दुर्गुणास दंड होतो, कोणे वेळे सुधारतो.

दुर्गुण सद्गुण वेष धरी, घात जाणा त्याचे अंतरीं.

दुराचरणापासून, दुःख होतें उत्पन्न.
गरीबा सदाचरणीं भूषण, श्रीमंता दुराचरणीं अपमान.

फनहा दाद, इलाही है. अ० जय होणें, ईश्वरी देणें.
दुष्ट कांहीं दिवस नांदती, परिणामीं फजित होती.

जुलमाने अदावती, अदावतीने तंटे होतीं.
सदाचरणाचें सुख, इहलोकीं आहे देख.
सदाचरण द्रव्यभरती, पाहिले नाहीं तें करविती.
श्रेय आणि सदाचरण, बापलेकाचें नातें जाण.
हिऱ्याची परीक्षा घनावीण, होत नाहीं हें जाण. अ० सद्गुण
परिक्षा आपत्काली, करीना येती हो चांगली.
अंतरीं सद्गुण असतो, बाह्यात्कारीं नसतो.
सद्गुणाप्रति, सर्व मानवति. सं० गुणःसर्वत्रपूज्यंतेनमहत्योपिसंपदः
सद्गुण पोषाक मानाचा, दुष्ट गुण अपमानाचा.

सद्गुण हें रत्न, अमोलिक जाण.
सद्गुणाचें वर्णन सर्व करिती, थोडे त्यापरी आचरती
सद्गुणाचा जन्म श्रेष्ठ, द्रव्यानें मानिती कनिष्ठ.
सदाचरण, जिवाचें समाधान.
सद्गुण असून रीति नाहीं, हासें होतें त्याचें पायीं.
सद्गुणी सद्गुणां मिळती, दुर्गुणी दुर्गुणां भांडती.
भोग विलासीं सुख, शेवटीं परम दुःख.

3953 Vows made in storms are forgotten in calms.

# W.

3954 Wake and be merry, sleep and weep.—*Oriental.*

3955 Wake not a sleeping lion. See No 2159.

3956 Walls have ears. See No 1644.

3957 Want is the mother of industry.

3958 War is a contingent evil, peace is a permanent good.

3959 War is death's feast.

3960 War with the world, and peace with England. *Spanish.*

3961 Wars bring scars.

3962 Was it not for hope, the heart would break.

3963 Wash your face with the water of a stagnant pond. —*Oriental.*

3964 Wash your hands in the running stream. *Oriental.*

3965 Waste not, want not.

3966 We are born crying, live complaining, and die disappointed.

3967 We are bound to be honest; but not to be rich. —*Scotch.*

3968 We are liable to many accidents that no care nor foresight can prevent.

3969 We are more mindful of injuries than benefits.

संकटीं नवस करी, विसरी गेल्यावरी. अ० काम पडल्या पुस-
ती, झाल्यावरी विसरती.

जागे सो गाजे,सोवे सो रोवे.अ० सावध तो पारपडे,आळस धरे तो रडे.
वाघाची खोड काढूं नये, दुष्टाचे वाटे जाऊं नये.
कुडास कान, ठेवीं ध्यान.
जातीची कंगाली, उद्योगाची माउली.
लढाईचे वाईट कर्म, सल्याचा बरा धर्म.
लढाईची उठावणी, मृत्यूची ती मेजवानी.
सर्व देशावर करा हल्ला, इंग्लांड देशाशी ठेवा सल्ला. अ० सम-
र्थाशीं भांडणें, तर हारीस येणें.
जे युद्धांत जाती, ते जखमा बाळगती.
आशा जनीं नसती, छाति फुटूनिया जाती.
गढीयाके पानीसे मुह धू आव. अ० खारे पाण्यानें, तोंड धुवून
येणें. अ० कांहीं मागणें, तें अमान्य करणें.
वहते नदीमे, हात धो लेवो. अ० वाहाते गंगेत हात धुणें, चाल-
ते काळीं उपकार करणें.
ज्याचा खर्च नाहीं, त्याची अगत्य नाहीं.
जन्मतांना रडणें, वाढतां चिंता वाहाणें, मरतां निराशी होणें,
हीं संसारीं जाणा लक्षणें.
प्रमाणीक होणें हा धर्म, द्रव्यवान होणें तें कर्म.

चहूंकडून विघ्नें येतीं, हुशारीनें न दूर होती.

उपकारापेक्षां अपकार, ज्यानीं ठेवती फार.

3970 We are never so happy or unfortunate as we think ourselves.

3971 We do not drive away even a dog that comes to our house.—*Oriental.*

3972 We frequently lose what we have by coveting more.

3973 We increase our wealth by lessening our desires.

3974 We know not which stone the scorpion lurks under.

3975 We lessen our wants by lessening our desires.

3976 We may give advice, but we cannot give conduct.

3977 We may receive instructions and warnings from the follies and facts of others.

3978 We must act in one's character.—*Oriental.*

3979 We must submit to the time.—*Oriental.*

3980 We never know the worth of water till the wells dry.

3981 We ought not to forget that our slaves are our fellow-men.—*Latin.*

3982 We should be careful not to be led away by outside show.

3983 We should be careful not to undertake more than we are able to perform.

3984 We should be contented when we are well off.

3985 We should be kind to all persons, even to those who are unkind to us.

3986 We should do as the world around does.

जेवढे कोणी मनी आणतें, तेवढे भाग्याभाग्य नसतें.

घर आये कुत्तेकोभी नही निकालते. अ० कोणी आला शरण, त्यास न देति मरण.

अधिक लोभाते धरितो, वारंवार हारीस येतो अ० लोभांत पडावें, तर जवळचें घालवावें.

इछा आवरुन धरी, तर द्रव्य संग्रह करी.

दगड पाहातां नदिसे, विंचु कोणत्या खालीं असे. अ० उद्योग उघडा करूंजाती, त्यांत लपून विधें राहातीं.

इच्छा कमी ठेवतां, अगत्य थोडी लागती.

उपदेश येतो देतां, आचरण दुजा हातां.

लोक वेडेपणें फसले, घ्यावे त्याचे हो दाखले.

वेडीचें सोंग धेणें, तर पाटांव फाडणें. अ० जसीं सोंगें घ्यावीं, तसी संपादणी करावी.

समयाप्रमाणें, सर्वांनीं वागणें.

कूपजळ सरे जेव्हां, त्याचें मोल कळे तेव्हां. हा० विहीर कोरडी पडती, पाण्याची किंमत समजती.

गुलाम जरी झाला, तरी एका खाणींतला.

बाहेरचें दाखवण्यानें, कधी भुलून न जाणें.

शक्तिप्रमाणें करावें, अधिक करीत न जावें.

खाउंन घेउंन सुखी आहे, त्यांत संतोष मानून राहे.

सर्वांशी असावें सदय, निर्दयाशीं नसावें निर्दय.

पांचाही आचरावें, तें आपण करावें

3987 We should never remember the benefit we have conferred, nor forget the favours received.-*Latin.*

3988 We should publish our joys, and conceal our griefs.

3989 We should use a book as a bee does a flower.

3990 We talk, but God doeth what he pleases.

3991 We think lawyers to be wise men, and they know us to be fools.

3992 Weak men and cowards are commonly wily.

3993 Wealth and content do not always live together.

3994 Wealth and state are gone, but the disposition is unaltered.—*Oriental.*

3995 Wealth is best known by want. See No 1853.

3996 Wealth is more dear to men than their blood.

3997 Wealth is not his who gets it, but his who enjoys it.

3998 Wealth makes worship.—*Portuguese.*

3999 Wealth maketh many friends; but the poor is separated from his neighbour.—*Scriptural.*

4000 Weep before a blind man and lose both your eyes. —*Oriental.*

4001 Weigh right, and sell dear.—*Italian.*

4002 Welcome death, quoth the rat, when the trap fell down.

4003 Well to judge, depends on well to hear.—*Italian.*

4004 Were things done twice, then all were wise.

4005 What a day may bring, a day may take away.

4006 What a man desires, he easily believes.

आपल्यावरी उपकार, झाल्या स्मर वारंवार; परावर उपकृति,
त्याची असावी विस्मृति.
दुःख सांगावें मनाला, सुख सांगावें जनाला.
पुस्तक वाचण्यां झटणें, मधुमक्षिकेप्रमाणें.
आपण व्हावें ऐसें ह्मणतों, ईश्वर इच्छी तैसें करितो.
सनदीवकिला ह्मणतो शहाणा, तो मूर्ख समजतो आपणा.

अधिर आणि अज्ञानी, कपटी असती जाणी.
संतोष आणि द्रव्य पाही, एकत्र राहात नाहीं.
हाल गया अहवाल गया, दिलका खियाल नगया. अ० पैका
गेला वेव्हार गेला, मूळस्वभाव नाहीं फिरला.
पैका कैसा आहे, गरज लागतां पाहे.
मनुष्याची पैक्यावर प्रीति, काळजा पलीकडे असती.
उपभोग घेतो त्याचा माल, संपादन करी तो धनपाळ.
द्रव्यज्याचे हातीं, त्याची करिती भक्ति.
द्रव्यास बहु मित्र मिळती, गरीबास सोडूनिया जाती. सं० धनेनप
रिलभ्यंतेजनेनबहुबंधवःदूरीकृतोभवत्येवदरिद्रोनिजबंधुभिः
अंधेके आगे रोये, दोनो दिदे खोये. अ० ऐकून घेत नाहीं,
त्याजवळ सांगून कांहीं.
महाग विकावें, पण अद्दल तोलावें.
उंदिर सांपळ्यांत पडे, लक्ष त्याचें मृत्यूकडे.

जो चांगलें ऐकून घेतो, तो न्याय चांगला करितो.
दोन वेळा काम केलें, सहज होतें चांगलें.
काले करून येतें, समय परत्वें जातें. अ० दिवस सारखे नसती,
चढते पडते असती.
जो जें इच्छितो, तो तें खरें मानितो.

4007 What advantage is it to a blind man that his parents had good eyes ?

4008 What begins in play may end in a fray. See No 2042.

4009 What belongs to the public belongs to no-body.

4010 What can the virtues of our ancestors profit us, if we do not imitate them ?—*Persian.*

4011 What can you expect from a pig but a grunt. See No. 3468.

4012 What can your enemies do, if you can enjoy the favor of God.—*Persian.*

4013 What cannot be cured must be endured.—*Latin*

4014 What connexion is there between Raja Bhoj and Gunga the oil man.—*Oriental.* See No. 3663.

4015 What does a blind man know of the beauty of the tulip.—*Oriental.*

4016 What does an ass know of the flavor of ginger. —*Oriental.*

4017 What does not float is rotten.

4018 What good can it do an ass to be called a lion. ?

4019 What has happened cannot be helped.—*Persian.*

4020 What I cannot do by might, I'll do by slight. —*Scotch.* See No. 1765.

4021 What is bought is cheaper than a gift.-*Portuguese*

4022 What is bred in the bone won't come out of the flesh. See No. 418.

आंधळे मुला उपयोगी नतरीं, आईबापा डोळे चांगले जरीं.
अ० आईबापाची कीर्ती, मुलाचे उपयोगी न पडती.

मस्करी करितां, लस्करी होती.

जें सर्व लोकाचें, तें नसें कोणाचें.

सदाचार आपले वडिलाचे, न चालवितां काय उपयोगाचे.

डुकराचे वाटे जाणें, डुरडुर शब्द ऐकणें. अ० वाईट वावरणें, वाईटच निघणें.

ईश्वर कृपा ज्यावरी, त्याचे शत्रु काय करी.

ज्यास उपाय नाहीं होत, तें सहन करणें प्राप्त. सं० गतेशोको नकर्तव्यो भविष्यं नैव चिंतयेत्.

कहां राजा भोज, कहां गंगातेली. म्ह० नगाऱ्याची घाई, तेथें टिमकी तुझें काई.

अंधा कीया जाने, लालकी बहार. अ० शहाण्याची मति, मूर्ख नजाणती.

गध्धा किया जाने, आदेका सवाद. गु० खाखरनी खलेडी, दराखनो सवाद स्तुजाणे. म० गुळाची चव, काय जाणे गाढव.

पाण्यावर तरत असतें, कुजून खालीं बसतें. अ० प्रतिष्ठा ज्याची फार चढती, हलका असतां खाली पडती

गाढवा सिंह म्हणणें, फायदा काय तेणें. अ० मूर्खांस शहाणा बोलणें, तीं आर्जवीक लक्षणें.

घडून आल्यावरी, उपाय काय तरीं.

नहोय बळें तरीं, हिकमतीनें करीं.

देणगीहूनि तें बरवें, स्वतां विकत जें घ्यावें.

जित्याची खोड मेल्यां, जात नाहीं कांहीं केल्यां. हिं० चोर चोरीसे गया, तो हेराफेरीसें नगया.

4023 What is done by night appears by day.—*Italian.*

4024 What is done cannot be undone.—*French.*

4025 What is got in the county is lost in the hundred.

4026 What is gotten over the devil's back is spent under his belly. See No. 1871.

4027 What is gotten with care, ought to be kept with wisdom.

4028 What is virtue but a medicine, and vice but a wound.

4029 What is yours is mine, but mine is another affair. —*Oriental.*

4030 What maintains one vice would bring up two children.

4031 What occasion for a mirror to look at a bracelet? —*Oriental.* See No. 2508.

4032 What one knows, it is useful sometimes to forget. —*Latin.*

4033 What pleases God must be, none can alter his decree.

4034 What soberness conceals, drunkenness reveals. *Latin.*

4035 What the eye sees, need not be guessed at. See No. 4031.

4036 What the eyes see not, the heart rues not.

4037 What the good wife spares, the cat eats.

4038 What the heart thinketh, the tongue speaketh.

4039 What the prince declares is justice, what the dice turn up is luck.—*Oriental.*

4040 what your glass tells you, will not be told by counsel.

अंधारांत होतें, तें उजेडास येतें.
जे झालें तें झालें, फिरत नाहीं काळें.
एक मार्गीं मिळवणें, दुसरे मार्गीं घालवणें.
दुष्ट कर्मानें मिळतें, तें दुष्ट मार्गीं जातें.

जें काळजीने मिळविणें, तें बुद्धीनें रक्षणें.

दुर्गुण हा कोणी एक घाय, सद्गुण हा औषधी उपाय.

तेरा सो मेरा, मेरा सो हेंहें. अ० जो आहे स्वार्थी, त्याचें बोलणे अर्थी.
एका व्यसनास लागे, तेणें दोघांचें पोट भागे.

हाथके कंगनको, आरसी किया. अ० हातचे काकणास, आरसा कशास.
जाणत असतां नाहीं बोले, असा समय येतो कोणे वेळें.

ईश्वर इछेस जें आलें, त्याचा नेम कोणा न टळें.
सावधपणें जें झांकतें, मद्यपानें तें उघडें होतें.
डोळ्यानें दिसतें, तें खरें भासतें.

जें दृष्टि पडत नाहीं, तें मनांत येत नाहीं.
सांचऊन ठेवणें, बोक्याची धन करणें. अ० राखून ठेवतो, भलता खातो.
जें मनांत येतें, तें जिभे वाटे पडतें.
राजा कहेसो न्याव, पासा पडेसो डाव.

जें कळतें स्वज्ञानानें, तें न सांगवे दुसऱ्याच्यानें.

4041 Whatever a wife wishes should be done, whatever mother wishes should not be done.—*Persian.*

4042 Whatever God gives, must be received with respect and thankfulness.—*Oriental.*

4043 Whatever is given to the poor, is laid up in heaven.

4044 When a dog is drowning, every one offers him water.—*French.* See No. 1747.

4045 When a flatterer praises his neighbour, he has some selfish end in view.

4046 When a man comes into trouble, money is one of his best friends.

4047 When a man is drowned, all the world is lost to him.—*Oriental.* See No. 764.

4048 When a man is not liked, whatever he does is amiss.

4049 When a man repeats a promise again and again, he means to fail you.

4050 When a peasant is on horse back, he knows neither God nor any one.—*Spanish.*

4051 When a proud man hears another praised, he thinks himself injured.

4052 When a third person interferes between two, he is like dust fallen into the eye.—*Oriental.*

4053 When a whore grows old, she becomes procuress. —*Persian.*

4054 When all is consumed, repentance comes too late.

4055 When all men say you are an ass, it is high time to bray.—*Spanish.*

बाईल सांगतां करी, आई सांगतां अव्हेरी.

ईश्वरी देणें, वंदन करणें. हिं० अल्लाका दिया शीरपर.

गरीबास देणें, तें कृष्णार्पण करणें.
कुत्रा पाण्यांत बुडतांना, पाजीत पाणी त्याला जाणा.

एका पुढे दुसऱ्याचें स्तवन, करितां दिसतें स्वार्थाचें लक्षण.

मनुष्य संकटांत येतो, पैका त्याचे कामीं पडतो.

आपडुबा तो जगडुबा. ह्म० आपण मेला, जगबुडाला.

जें ज्यास न आवडें, करील तें होईल वांकडें.
फारफार वचन देतो, त्याचे मनीं दगा असतो.

रानटी घोड्यावरी स्वांर, नोळखे मनुष्य ईश्वर. ह्म० ज्यानें नाहीं पाहिला आवा, त्याणें पाहिला दिवा.
एकाचीहो करितां स्तुति, अभिमानी जळे चित्तीं.

दोमेतिसरा जैसा आंखमे कंकर. ह्म० दोघांत तिसरा येतो, डोळ्यांतला केर होतो. सं० द्वाभ्यांतृतीयोनभवामिराजन्.
वेश्या होतां म्हातारी, कुंटणकीते आचरी.

अवघे उडविल्यावरी, पश्चाताप मग करी.
सर्व लोक गाढव ह्मणती, तर सावध होय चित्तीं.

4056 When an ass climbs a ladder, we may find wisdom in women.—*Hebrew.*

4057 When an ass is among monkeys, they all make faces at him.

4058 When bread is wanting, oaten cakes are excellent. —*Spanish.*

4059 When candles are out, all cats are grey. See No 3891

4060 When children stand quiet, they have done some harm.

4061 When flatterers meet, the devil goes to dinner.

4062 When flower falls the fruit comes.—*Oriental.*

4063 When fortune comes smiling, she always designs the most mischief.

4064 When fortune smiles, take the advantage.

4065 When fortune turns against a person, his horse becomes an ass.—*Persian.*

4066 When friends meet, hearts warm.—*Scotch.*

4067 When God pleases, it rains with every wind.

4068 When gold speaks, all tongues are silent.—*Italian.*

4069 When he had filled his belly he began to vex the poor.—*Oriental.*

4070 When honor grew mercenary, money grew honorable.

4071 When I did well, I heard it never; when I did ill, I heard it ever.

4072 When I had pease, I had no teeth, and now that I have teeth, I have no pease.—*Oriental.*

